# शिक्का-कट्यार

[ गद्य-पद्यात्मक ऐतिहासिक नाटक ]

लेखक

**यशवंत नारायण टिपणीस**

' कमला, ' ' मत्स्यगंधा, ' ' राधामाधव, ' ' जरासंध, ' ' चंद्रग्रहण, ' ' नारद, '
' शहा-शिवाजी, ' ' आशा-निराशा, ' ' गुरुचरणीं, ' ' राजरंजन, ' इ०
नाटकांचे कर्ते

—: प्रकाशक :—

**बलवन्त पुस्तक भाण्डार,**

गिरगांव नाका, मुंबई नं. ४.




क्रमांक १६

तृतीयावृत्ति

१५ ऑगस्ट १९५०

किंमत
१॥
रुपया

## कै. यशवंत नारायण ऊर्फ अप्पा टिपणीस यांचा

# अल्प परिचय

टिपणीस या आडनांवावरून, हें घराणें मराठेशाहीच्या ऐन अमदानींत पराक्रम केलेलें असलें पाहिजे हें न सांगतांहि कळण्यासारखें आहे. टिपणीस हे महाडशेजारीं असलेल्या गोंडाळें गांवचे खोत. चरित्रनायकाचे वडील हे मोठे रसिक व तबलावादनांत प्रवीण म्हणून त्या काळीं प्रसिद्ध होते. त्यांचे वडील चिरंजीव चांगले मूर्तिकार होते, नंबर दोनचे चिरंजीव चांगले कवि होते, तिसरा अनुक्रम आपल्या चरित्रनायकाचा, चवथे नट आहेत व पांचवे मात्र शेतकरी आहेत. अप्पांचा जन्म ता. ३ डिसेंबर १८७६ सालीं महाड येथें झाला. त्यांचें प्राथमिक शिक्षण महाड येथें झालें. इंग्रजी शिक्षणाकरितां ते कांहीं वर्षें पुण्यास होते. त्यांना नाटकाचा नाद लहानपणापासून होता. नाटकाची विशेष आवड उत्पन्न होण्याचें कारण त्यांचे चुलते कै. प्रो. गोविंद गोपाळ टिपणीस. यांच्या प्रोत्साहनामुळें प्रत्यक्ष ' महाराष्ट्र नाटक मंडळी ' काढण्यापूर्वी गांवांतच वारंवार आसपासचे मंडळीसह नाट्यप्रयोग बसविले जात व त्यांत अप्पा प्रामुख्यानें भाग घेत असत. त्यांतील कांहीं प्रयोगांतून प्रथम त्यांनीं नायिकेच्या भूमिका केल्या. मॅट्रिकचे वर्गांत असतां प्रकृतीच्या अस्वास्थामुळें शिक्षण सोडून त्यांना महाड येथें जावें लागलें. तेथें त्यांनीं कांहीं दिवस शेती केली व उरलेल्या वेळीं ते शिवणकाम उत्तम प्रकारें करीत असत. पण जातिवंत कलावंताच्या जिवाला तशा गांवांत व तशा व्यवसायांत चैन पडणें शक्य नव्हतें. त्यांच्या हातून नाट्यकलेची वाढ व्हावयाची होती; त्यांच्या हातून यशस्वी नाटकें लिहिलीं जावयाचीं होतीं. त्यांचे हौशी व प्रेरक चुलते गोंदूकाका या वेळीं पुण्यास होते. त्यांचीं गांवांतील नाटकें व्यावसायिकांसारखीं उत्कृष्ट होतात असें म्हणणाऱ्या गांवांतील प्रेक्षकांच्या चेतावणीनें, त्यांनीं नमुनेदार नाटक मंडळी काढावयाची असा मनाशीं संकल्प केला आणि वडील माणसांची संमति मिळवून त्यांनीं पुणें गांठलें.

आपल्या गोंदूकाकांशीं व त्यांच्या इष्टमित्रांशीं चर्चा करून त्यांनीं ' महाराष्ट्र नाटक मंडळी ' ची कांहीं भागीदार घेऊन स्थापना केली. या मंडळीचा पहिला

प्रयोग ' कांचनगडची मोहना ' ता. ९ सप्टेंबर १९०४ ला पुणें येथें झाला. या मंडळीची वाढ करण्यांत व तिला नाट्यव्यवसायांत मानाचें स्थान मिळवून देण्यास अप्पांनीं आर्थिक, मानसिक, शारीरिक सर्व तऱ्हेनें झीज सोसली. प्रतिभाशाली गडकऱ्यांना नाटककार बनविण्यांत अप्पांचे परिश्रम बरेचसे कारणीभूत झाले. ऐतिहासिक वेषभूषा व दृश्यें वास्तवतेच्या दृष्टीनें प्रथम अप्पांनीं रंगभूमीवर आणलीं. त्याचप्रमाणें ग्रीज पेन्टस् सारखे तोंडाला लावावयाचे रंग येथेंच तयार करावयास सुरवात प्रथम अप्पानीं केली. १९१० पर्यंत अप्पांनीं नाटक मंडळीचा भागीदार, नट, स्टेज मॅनेजर, तालीम मास्तर म्हणून लौकिक मिळविलाच; पण यानंतर त्यांनीं नाटककार व्हावयाचें ठरविलें व ते त्या प्रयत्नास लागले. आपल्या पहिल्या नाटकाचे कथानकाची मांडणी त्यांनीं मेरी कॉरेलीच्या 'थेल्मा' या कादंबरीच्या आधारें करावयाचें ठरविलें. रंगभूमीचा सर्व प्रकारें त्यांना अनुभव होताच. त्या कादंबरींतून सुटसुटीत कथानक नाटकाकरितां तयार करून ' कमला ' नांवाचें सामाजिक नाटक त्यांनीं लिहिलें व तें महाराष्ट्र नाटक मंडळीचे रंगभूमीवर १९११ चे फेब्रुवारी महिन्यांत आणलें. त्या नाटकानें त्यांना नाटककार म्हणून लौकिक मिळवून दिला. नाटक मंडळीचे मालक, नट व नाटककार होण्याचा मान मिळविणारे अप्पा तिसरे गृहस्थ होत. हा वेळपर्यंत त्यांनी अव्यभिचारी कलोपासना केली. सांसारिक किंवा इतर गोष्टींत लक्ष घातलें नाहीं. कमला नाटकाचा प्रयोग झाल्यानंतर म्हणजे सन १९११ च्या अखेरी—अखेरीस त्यांचा विवाह झाला.

त्यांच्या लौकिकाचा झालेला परिणाम म्हणून म्हणा अगर इतर अंतर्गत भानगडींमुळें म्हणा त्यांचें आणि भागीदारांचें पटेनासें झालें. 'महाराष्ट्र नाटक मंडळी' सारख्या पुढारलेल्या नाट्यसंस्थेंत फाटाफूट होऊं नये म्हणून पुष्कळ मोठमोठ्या माणसांनीं मध्यस्थी केली पण त्याचा कांहींही परिणाम न होतां १९१२ च्या जूनमध्यें त्यांनीं ती कंपनी सोडली व स्वतःचे मालकीची ' भारत नाटक मंडळी ' स्थापन केली. अप्पांचे सरळ व सुस्वभावी वागणुकीमुळें अप्पांचेकरितां ' महाराष्ट्र नाटक मंडळीं ' तील नामवंत नट त्र्यंबकराव प्रधान, वामनराव पोतनीस व दुय्यम दर्जाची कामें करणारे सात आठ नट त्या मंडळीला रामराम ठोकून अप्पांचे मंडळींत येऊन दाखल झाले. आपले मंडळीकरितां ' मत्स्यगंधा ' नांवाचें नवीन नाटक अप्पांनी लिहिलें. त्याचा प्रथम प्रयोग ८ सप्टेंबर १९१२ रोजीं पुणें मुक्कामीं झाला. या नाटकाची साजसजावट व दृश्यें अगदीं नवीन प्रकारचीं केलीं होतीं.

हें नाटक अतिशय लोकप्रिय झालें. त्यांनीं आपल्या नवीन नाटक मंडळीकरितां दे. भ. तात्यासाहेब केळकर यांचें " तोतयाचें बंड ", कै. तात्यासाहेब कोल्हटकर यांचें " वधूपरीक्षा " कै. अच्युतराव कोल्हटकर यांचें " विवेकानंद " इत्यादि नाटकें लिहवून घेऊन तीं चांगल्या साजसजावटींत रंगभूमीवर आणलीं.

सन १९१९ नंतर नाटककार म्हणून त्यांनीं चांगलीच कीर्ति मिळविली. गंधर्व ललितकला, किर्लोस्कर इत्यादि त्या काळीं प्रमुख समजल्या जाणाऱ्या नाट्यसंस्थांनीं त्यांचेकडून नाटकें लिहवून घेऊन तीं रंगभूमीवर आणलीं. १९११ सालीं त्यांना नाट्यसम्मेलनाचे अध्यक्षपदाचा मान मिळाला. १९३४ च्या महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या नाट्यशाखेच्या अध्यक्षपदावर त्यांचीं निवड करण्यांत आली. त्यांचीं सोळा नाटकें रंगभूमीवर आलीं. अप्रकाशित व कांहीं अपुरीं अशीं चार राहिलेलीं आहेत. ऐतिहासिक व पौराणिक नाटकांकडे त्यांचा विशेष ओढा. एक दोन नाटकें तर गुजराथी नाटक मंडळयांनीं लिहवून घेऊन तीं रंगभूमीवर आणलीं. हें भाग्य हातावर मोजण्याइतक्याच महाराष्ट्रीय नाटककारांना लाभलें आहे. ज्यांचीं नाटकें भाषांतरित करून आपल्या रंगभूमीवर आणावीं असा विलोभनीय मोह परप्रांतीय नाट्यव्यवसायिकांना वाटला, त्यांपैकीं अप्पा हे एक आहेत. त्यांच्या नाटकांनीं गुजराथी रंगभूमी तर पाहिलीच; परंतु कानडी, तेलगु, तामीळ इत्यादि दूरच्या परप्रांतीयांनींहि त्यांचीं नाटकें मोठ्या हौसेनें आपल्या रंगभूमीवर आणलीं. महाराष्ट्रीय नाटककारांच्या उज्ज्वल परंपरेंत अप्पांनीं फार मोठी भर घातली आहे. अप्पांनीं हीं नाटकें लिहून जवळजवळ दोन तपांचा काळ उलटून गेला आहे तरी प्रेक्षकांवर व हौशी नाट्यव्यवसायिकांवर त्यांच्या नाटकांची एवढी पकड आहे कीं, अजूनहि दरवर्षी त्यांच्या नाटकांपैकीं ७-८ नाटकांचे नाट्यप्रयोग गांवोगांवीं मिळून ५०-६० तरी होत असतात.

त्यांचीं दोन-तीन कथानकें मूकपट व बोलपट संस्थांनींहि चित्रित केलीं आहेत व तीं यशस्वी झालीं आहेत.

अप्पा प्रथमपासून राष्ट्रीय वृत्तीचे. गांधीयुग सुरू झाल्यानंतर चळवळींत भाग घ्यावा अशी त्यांची इच्छा असूनहि त्यांना शारीरिक दुर्बलतेमुळें तसें करतां आलें नाहीं. पण या त्यांच्या इच्छेला अनुसरून त्यांच्या पत्नीनें व कन्येनें त्या चळवळींत भाग घेतला आणि तुरुंगवासहि पत्करला. अप्पा शेवटपर्यंत खादी वापरीत असत.

अप्पा वृत्तीनें सात्त्विक असून त्यांची राहाणी अत्यंत साधी होती. मद्यपान अप्पांनीं केव्हांहि केलें नव्हतें.

योजक आणि कल्पक कलावंतांचें दारिद्र्य हें भूषण असतें. अप्पांचे आयुष्यांतील कांहीं वर्षें सोडलीं तर या भूषणाचें लेणें त्यांनीं कैक वर्षें मोठ्या अभिमानानें अंगावर मिरविलें. रसिकश्रेष्ठ इंदूर नरेश श्री. तुकोजीराव महाराज होळकर यांच्या कलाप्रियतेचा व अप्पांच्या कल्पनाचातुर्याचा संयोग होण्याचा योग एक वेळ जमून आला असतांहि, आश्रयदात्यांची आणि अप्पांची गांठ पडतां नये असा जणु नियम असल्यामुळें तो उधळला गेला. दुर्दैव महाराष्ट्र रंगभूमीचें; कारण महाराजांच्या कलेच्या हौसेपायीं जो पैसा खर्च व्हावयाचा तो झालाच पण तो कल्पक कलावंतांचे हातीं न पडल्यामुळें महाराजांच्या हौसेचें चीज झालें नाहीं व अप्पांना आपलें कल्पनाचातुर्य दाखवितां आलें नाहीं.

याप्रमाणें चाळीस वर्षें महाराष्ट्र रंगभूमीची बौद्धिक, शारिरीक, मानसिक व आर्थिक अशी सर्व प्रकारें सेवा करणारा एक नट, दिग्दर्शक, कल्पक नाटककार २५ मार्च १९४३ रोजीं आम्हांला सोडून अर्धनारीनटेश्वराच्या रंगभूमीचा महोत्सव साजरा करण्यासाठीं कैलासीं निघून गेला.

-पु. रा. लेले

# तिसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना

महाराष्ट्रांतील प्रेक्षकांच्या रसिकतेमुळें आणि नाटकाच्या रम्यतेमुळें ' शिक्का-कट्यार या नाटकाची दुसरी आवृत्ती संपून तिसरी आवृत्ती काढण्याची संधी मला मिळत आहे, हें खरोखर माझें सद्‌भाग्य होय. जवळ जवळ तेहतीस वर्षे हें नाटक महाराष्ट्राचें मनोरंजन करीत आहे आणि पुढेंहि करीत राहील अशीं स्पष्ट चिन्हें दिसत आहेत.

आतां जरी हें नाटक ' शिक्काकट्यार ' या नांवानें ओळखलें जातें तरी या नाटकाचें मूळचें नांव ' राज्या-रोहण ' हें होतें. ह्याच नांवानें तें १९१८ च्या फेब्रुवारी महिन्यांत ' आर्यावर्त ' नाटक मंडळीच्या रंगभूमीवर आलें. या नाटकाचे प्रयोग मुंबईच्या रंगभूमीवर केले त्यावेळीं तें नाटक पुस्तक रुपानें प्रसिद्ध झालें नव्हतें. त्यानंतर ललितकलादर्श मंडळीचे मालक व आप्पांचे मित्र कै. व्यंकटेश बलवंत उर्फ बापूसाहेब पेंढारकर यांनीं संगीत रूपांत त्याचें पुनरुज्जीवन करण्याची इच्छा प्रदर्शित केल्यावरून कै. आप्पांनीं तें संगीत रुपानें महाराष्ट्र रसिकांच्यापुढें ठेवण्याचें ठरविलें. या नाटकाचा प्रथम प्रयोग ता. २-६-१९२७ रोजीं ललितकलादर्श मंडळीच्या रंगभूमीवर झाला. दत्त-विधानानंतर मुलाचें व विवाहा-नंतर मुलीचें नांव बदलण्याची वहिवाट आहे. त्याप्रमाणेंच गद्यांतून संगीत रंगभूमीवर करतांना जुनें ' राज्यारोहण ' नांव रद्द करून त्याला 'शिक्का-कट्यार' असें नवीन नांव दिलें गेलें. मराठी रंगभूमीवर अतिशय गाजलेलीं आणि लोकप्रिय झालेलीं जीं थोडीं नाटकें आहेत त्यांत ' शिक्का-कट्यार ' ची गणना होते.

ती. लेलेकाका ( पु. रा. लेले ) ह्यांनीं माझ्या विनंतीला मान देऊन कै. आप्पांचा अल्प परिचय लिहून दिल्याबद्दल मी त्यांची अत्यंत आभारी आहें. ही आवृत्ति ' शिक्काकट्यार ' च्या पहिल्या आवृत्तीवरहुकूम काढली आहे. रसिकांनीं मान्य करून घ्यावी एवढीच विनंति.

६९ विजयनगर,
दादर मुंबई १४.
१९५०

आपली नम्र,
**आशा श्रीकांत सुतार**
**( कुसुम यशवंत टिपणीस )**

श्री

# शिक्का-कट्यार



**ईशस्तवन.**

(पद १—राग देसकार. ताल त्रिवट.)

**मुरलिधरा शाहिरा वीरा । वितरि सुधेच्या धारा रे ॥ धृ० ॥**
**समर-रसिकता गाउनि गीता । राज्यपथा ने पार्था रे ॥ १ ॥**
**कट्यार यमकरिं शिक्का विधिकरिं । दाविसि धाका लोकां रे ॥ २ ॥**

---

## अंक पहिला



### प्रवेश पहिला

(**स्थळ** : गोदावरीच्या तीरावरील एक राई. राजकुंवर गाणें गात असून सखु प्रवासांतील सामानाची आटपाआटप करीत आहे.)

**सखु** : ताईसाहेब, पुरे झालीं हीं गाणीं. आपल्याला आतां झटपट निघायला नको का? दिवस मावळेतों साताऱ्याला घरीं पोंचायला हवं.

**राज०** : मग न पोंचायला ग काय झालं? आतां कुठं उजाडलं आहे. उन्हं तरी पडलीं आहेत का अजून नीटशीं? अग, ही प्रातःकाळचीं पवित्र वेळ! गोदावरीचं निर्मळ गंगाजळ!—मी तर म्हणतें, कीं स्नान करून सीतागुंफेचं दर्शन घेतल्यावांचून इथून निघायचं नाहीं. माझी साडीचोळी काढ पाहूं. बघतेस काय अशी टकमक? पंचवटीच्या सीतारामाचं दर्शन घेतल्यावांचून आज अन्नग्रहण करायाचं नाहीं.—हं काढ माझं चोळीपातळ.

**सखु :** हद्द झाली या हट्टापुढं. जिथं तिथं हट्ट! घरीं हट्ट—दारीं हट्ट—प्रवासात-सुद्धां हट्टच! उद्यां वडिलांनीं एक नवरदेव ठरवावा आणि यांनीं आपलं दुसऱ्याशींच लगीन करीन म्हणून हट्ट धरावा! असंच व्हायचं कीं नाहीं?

**राज० :** (वेडावून) तूं म्हणतेस तसंच बरं?—अग आम्ही शिर्क्यांच्या पोरी—कोण हट्टी नाहीं आमच्यांत? थोरल्या सोयराबाईसाहेब हट्टी! येसुबाईसाहेब हट्टी! आणि अंबिकाबाईसाहेब हट्टीच! अग हट्ट आमच्या पांचवलाच पुजलाय! हट्टी आहोंत म्हणून आम्ही कुणीतरी आहोंत. मीच सांगतें ना, मी तर पक्की हट्टी आहें! मनांत येईल तें करीन; कुणाचं ऐकायची नाहीं.

**सखु :** काय तरी बाई! हट्टाबद्दल खरं म्हटलं तर एखादीला वाईट वाटावं; पण आमच्या ताईसाहेबांचा प्रकार दुनियेवेगळाच! त्यांना हट्टाबद्दल अभिमानच वाटतो! बागलाणांतून निघतांना मामासाहेबांनीं चांगला मेणा बोलावला; दहावीस स्वारांना बरोबर जायचा हुकूम झाला; पण आमच्या ताईसाहेब अडल्या! म्हणे मेणा नको आणि ते स्वारही नकोत! एक बारगीर अन् दासी घेतली बरोबर आणि निघाल्या घोड्यावरून!

**राज० :** घोड्यावरून नाहीं तर मग काय उंटावरून निघायचं? ए उंटावरचे शहाणे! बोल बोल कीं पुढं. थांबलीस कां? पुढचं पुराण चालूं दे ना.

**सखु :** माझं पुराण का? मी अशी तोंडाला खीळ घालून गप्पच बसतें. मी उंटावरची शहाणी ना? गाढव मी म्हणून बोललें. आतां शब्द बोलेन तर शपथ!

**राज० :** माझ्यापुढं तुझ्या शपथा चालायच्या नाहींत. हं सांग, 'ताईसाहेब घोड्यावरून निघाल्या'!-हो! पण वाटेंत त्रास होऊं नये, म्हणून निघतांनाच आम्ही पुरुषाचे वेष कसे घेतले, तें नाहीं सांगितलंस? जंगली श्वापदं कांहीं आमच्या वाटेला जात नाहींत. सारी रात्र आपण या जंगलांत काढली—तूं नको नकोच म्हणत होतीस—पण साऱ्या रात्रींत एखादी तरी वाघाची आरोळी किंवा लांडग्याची किंकाळी तूं ऐकलीस का? गरीब बिचारी जंगली जनावरं! तीं मानवी श्वापदांसारखी क्रूर का असतात? पुरुष म्हणजे पापी शिरजोर! एकटी दुकटी बायको प्रवासांत दिसली कीं लागली यांची नजर तिच्यावर!—

(**पद २—राग** सारंग. **ताल** त्रिवट.)

**स्मितमुख साधा भोळा हलवुनि डोळा। खुलवि मुक्या**
**कळिला॥ धृ०॥ मरणि झुरति किति लांछित बाला।**
**चिडुनि अति देति शापा। 'हा खला'॥ १॥**

हं, बसलीस काय अशी ? काढ माझं चोळीपातळ. मी आज चांगली पोहणार आहे. इथं कुणी चिटपाखरूंही नाहीं. कशी निवांत शांत आहे ही जागा ! माझ्यासारख्या पोरीबाळींनं मनमुराद स्नान करावं ! ( चोर ‘ काळाकाईचा चांग भले ’ म्हणून ओरडत येतात. सर्व चपापतात. राजकुंवर धांवत जाऊन ढाल तरवार वगैरे घेऊन सज्ज होते. )

**राज०:** हे चोरटे आले ! बारगीर, घोडी तयार कर जलदी.

**१ चोर :** अर चांग्या, आवारं आवा. घे उडी एकक्यावानी. खंड्या, कोंड्या, दगड्या, धांवा मर्दांनों, आडवा त्या बाजूनं.

**सखु :** अग आईग ! आलेग मेले किती तरी ! कुठं दडूं आतां. ( पळते )

**राज :** खबरदार ! पाऊलभर तर पुढं या–तीं पावलं तिथल्या तिथं गळून पडतील. माझ्या–कुंवारणीच्या आंगाला हात तर लावा–ते हात तिथल्या तिथं तुटून पडतील.

**१ चोर :** बस कर हा तोंडाचा बक्वा. तूं कुंवारीन हायेस नाहीं ? खंड्या, घाल झडप वाघावानी, अन् मार बगलत या शेळीला.

**राज :** तुम्ही वाघ आणि मी शेळी ? वाघिणीपुढं मेंढरं कशीं पटापट प्राण टाकतात तें दाखवतें तुम्हांला. हातांत ही बिजली आहे आणि कुडींत जीव आहे, तोपर्यंत मी हातीं लागेन ही आशाच सोडा. असेल तर पहा या बिजलीची चमक ! जय अंबाबाई ! ( चोरट्यांवर तुटून पडते. बारगीर येऊन लढूं लागतो. चोरटे ‘ चांग भले ’ म्हणून ओरडत लढतात. बारगीर जखम होऊन पडतो. राजकुंवर लढतां लढतां पडते. चोर तिला धरणार इतक्यांत शाहू येतो. )

**शाहू :** नामर्द ! हट मागं अनाथ पोरींवर हल्ला ? बेशरम ! ( चोरांशीं लढतो. जोत्याजी, शुक्रजी व कांही शिपाई येतात व लढतात. चोरटे पळतात. )

**शुक्र० :** गेले हरामखोर–भागुबाई—

**शाहू :** ( राजकुंवरजवळ जाऊन ) अरेरे ! बिचारी बेशुद्ध पडली आहे. हकीमजी कुठं आहेत ? जारे कुणी तरी हकीमजीला बोलावा. ( एकजण जातो. ) कोण बरं ही असेल ? कुमारिका दिसते. जोत्याजी, वारा घाल पाहूं जरा. अरे, आस्ते आस्ते वारा घालरे. शुक्रजी, पाणी घाला पाहूं जरा तोंडांत. ( शुक्रजी पाणी घालतो. ) अजून येत नाहीं शुद्धीवर ! हकीमजीकडे गेलं का कुणी ?

**जोत्या० :** जासूद गेला आहे हकीमजीला शोधायला.

**शाहू** : मग तो परत कां नाहीं आला अजून ?
**शुक्र** : महाराजांसारखे त्याला अद्याप पंख फुटले नाहींत ?
**शाहू** : म्हणजे मला पंख फुटले ? या शाहूला पंख फुटले ?

**शुक्र०** : नाहींत का आपल्याला पंख फुटले ? सरकार, दिल्लीच्या कैदखान्यांतून भरारी मारून आपण या महाराष्ट्रांत–आपल्या स्वतःच्या राज्यांत आलांत, ते पंख फुटल्यावांचून का ?

**शाहू** : होय ? खरंच मला पंख फुटले. एखाद्या पांखराला पंख फुट्न घरट्या-बाहेर पडतांच स्वैरसंचार करण्याची त्याला वासना होते; त्याप्रमाणं या स्वतंत्र महाराष्ट्रांत माझं पाऊल पडतांच, नव्या नव्या कल्पना—नवे नवे विचार–नव्या नव्या आशा माझ्या हृदयांत थैमान घालूं लागल्या आहेत ! (जासूद येतो.)

**जासू०** : हकीमजी नदीकाठीं नमाज पडताहेत, आटोपतांच येतों म्हणतात.

**शुक्र०** : महाराजांना पंख फुटले तर या हकीमजींना कान फुटले ! अगोदर जाऊन त्यांच्या कानाची छाटणी करतों.

**शाहू** : छेः शुक्लजी, हकीमजी वृद्ध असून धर्मनिष्ठ आहेत; येऊं द्या त्यांना नमाज आटोपून. कुणाच्याही धर्मकृत्याच्या आड येणं चांगलं नाहीं. ( हकीमजी येतो ) या हकीमजी. किती उशीर केलांत ! अगोदर त्या मुलीला पहा जरा.

**हकी०** : हां–जी हुजूर. ( राजकुंवरची नाडी पहातो. )

**शुक्र०** : आतां पाहून काय उपयोग ! वराती मागून घोडें !

**हकी०** : पंडीतजी, आप् तो बहोत् अकलमंद आदमी हो. और एक दिन् वैसाभी आयेंगा, के आपकोभी मेरी जरुरत् लगेंगी.

**शुक्र०** : साहेबजी, तें विसरा. तशीच पाळी आली तर हा कंठ आवळून मी प्राण देईन; पण तुमच्या त्या यावनी औषधाचा घोटसुद्धां घशाखालीं जाऊं देणार नाहीं !–हो पण एक गोष्ट ध्यानांत ठेवा प्रथम. तुम्ही आतां या महाराष्ट्रांत म्हणजे मराठी राज्यांत आलां आहांत आणि इथले राजे आहेत मराठे; तेव्हां मराठीच बोललं पाहिजे सर्वांनीं. मीसुद्धां पहा, रांगडी भाषा सोडून मराठी भाषा बोलूं लागलों आहें.

**हकी०** : या अल्ला ! मेरे को—

**शुक्र०** : हं हकीमजी, ' या अल्ला ' आणि ' मेरे को ' बस करा आतां. जो कायदा तो कायदा ! आमचे राजे मराठे–आमची भाषा मराठी ! यथा राजा तथा प्रजा !

हकिमजी, आतां तुम्ही मराठीच बोललं पाहिजे आणि औषधंही मराठीच दिलीं पाहिजेत.

**शाहू :** अहो, पण त्यांच्यावर हा जुलूम कां तुमचा ? शुक्लजी, तुम्हांला काळ वेळ कांहीं समजत नाहीं. या मुलीच्या प्राणावर प्रसंग आणि तुमचा चालला आहे वाद–मराठी का यावनी ! हकीमजी, कसं काय वाटतं हिच्या प्रकृतीचं मान ?

**हकी० :** तबियत् तो ठीक है. बहोत् तकलीफ हुवी है. घबरी गई है बिचारी ! इन्को थोडा आराम होना चाहिये. ए दवा मै देता हूं. अबीके अबी खडी हो जायेगी ( औषध डोळ्यांत भरतो ) देखो सरकार, ए लडकी भानपर आती है. ये सब लोगोंको दूर जानेका हुकूम दीजिये. आपभी थोडा देर तक् दूर जानेकी तकलीफ लीजीये. और मैभी रजा मंगता हूं.

**शाहू :** चला रे सगळे दूर; पण हकीमजी, इथं कुणी बायको माणूस नाहीं–पण कांहीं हरकत नाहीं; आम्ही करूं तिची व्यवस्था. या आपण.

**जोत्या० :** तो एक माणूस जखमी होऊन पडला आहे तिथं, त्याला पहा जरा हकीमसाहेब.

**शाहू :** जा, जा पहा. मीहीं जातों (हकीम व सर्व जातात.) मी ' जातों ' असं म्हटलं खरं; पण माझे पाय हुकूम मानीत नाहींत ! या सुंदरीच्या सौंदर्याची सत्ता माझ्या मनावर-शरीरावर–सर्व गात्रांवर चालू होऊन मी परतंत्र तर झालों नाहीं ?

( **पद ३—राग** मियाचा मल्हार. **ताल**—एकताल.)

**मधुप हा पिसा कसा सुवासा ! कमलिनिपाशा फसे**
**अधिरसा । वांछितां विलासा ॥ धृ॥ हृदयिं मदन**
**संचरला । व्याकुळ करि जिवाला । तनु कांपे थर थर**
**थर । मनहंसा प्रणयसुख पिपासा** ॥ १ ॥

—अरे ! ही उठून बसूं लागली ! इथून जावं का ?—

**राज० :** ( बसून इकडे तिकडे पाहून ) अगबाई ! ते चोरटे गेले वाटतं ! कसले जातात, इथंच कुठं तरी दडून बसले असतील ! आतां कसची सुटका आणि कसची बाबांची भेट ! आई अंबाबाई ! तूंच माझी रखवालदारीण आहेस या भयंकर प्रसंगांत!

**शाहू :** आपल्याला काय हवं ? मला सांगा, आपण उठूं नका. आमच्याबरोबर कुणी बायको माणूस नसलं तरी आपली योग्य ती बरदास्त रहाणार नाहीं अशी शंका घेऊं नका. मी स्वतः आपल्या सेवेला हजर आहें.

**राज० :** ( उभी राहून ) हं दूर उभे रहा. मी जरी एकटी असलें तरी मी जाति-वंत मराठ्याची मुलगी आहें ! ही पाहिलीत कट्यार ? ही अशी खुपसून घेऊन ( कट्यार मारून घेऊं लागते. )—

**शाहू :** ( तिचा हात धरून ) हां-हां-हें काय भलतंच ! आपला गैरसमज तर झाला नाहीं ? मी चोरटा नाहीं; उलट त्या चोरट्यांच्या हातून आपणांला सोडविणारा एक भाग्यवान् वीर आहें. आपण एक मराठा तरुणी आहांत, तसाच मी एक मराठा तरुण आहें.

**राज० :** ( स्वगत ) याचं भाषण मंत्रजाल तर नाहीं ! असला थोरपणा चोरट्यांत कसा संभवेल ? ( उघड ) मग मी चोरट्यांच्या तावडींत नाहीं तर ?

**शाहू :** छे, मुळींच नाही; उलट आपल्या मित्रांच्या जवळ आहांत. मला परका मानूं नका. अगदीं आपला जवळचा आप्त समजा. आपण कोण ? आपल्याला कुठं जायचं हें कळेल तर नीट बंदोबस्तानं आपल्या घरीं आपली रवानगी करून देतां येईल. आपलं नांव—

**राज० :** मला राजकुंवर म्हणतात. मी कुंवरजीराजे शिरक्यांची मुलगी. चार महिने आजोळीं होतें; पण परवां बाबांकडून निरोप आला, तेव्हां बरोबर एक दासी आणि बारगीर घेऊन निघालें. या जंगलांत चोरट्यांनीं एकदम आमच्यावर हल्ला केला आणि मला धरून पकडणार, तों एकाएकीं मला मूर्च्छा आली.

**शाहू :** पण एक गोष्ट आपण चोरून ठेविलीत. त्या चोरट्यांबरोबर एक तरुण स्त्री लढत होती, ती कोण ? तिच्या पराक्रमाचा नाहीं उल्लेख केलात ?

**राज० :** महाराज, संकटाच्यावेळीं आमची कुलस्वामिनी शिर्काबाई आमचं रक्षण करते. तिनंच आपल्याला पाठवून मला सोडवलं नाहीं का ?

**शाहू :** जगदंबेनं मला पाठवलं आणि त्या चोरट्यांना पिटाळून मी आपल्याला सोडवलं, हें खरं असेल. पण जी महिषासुरमर्दिनी हातांत खड्ग घेऊन त्या चोरट्यांचं चंदन उडवीत होती, ती तर इथं माझ्यासमोर आहे. देवी, हा तुझा भक्त तुझ्या सेवेला तयार आहे.

**राज० :** हं ! असं काय ! वाः ! मला तर त्या चोरट्यांपेक्षां इथंच जास्त चोरटेपणा आढळतो बाई !

**शाहू :** तें साहजिकच आहे. कारण माझा जन्म एका बड्या चोरट्याच्या कुळांत झाला आहे.

**राज० :** काय ! आपला जन्म चोरट्याच्या कुळांत ?

**शाहू :** अगदीं अट्टल लुटारूंच्या कुळांत ! राजकुंवर, पारतंत्र्याच्या निष्ठुर परिस्थितींत, स्वतःच्या पुण्यवान् पूर्वजांना चोर लुटारू म्हणावं लागतं ! त्यांनीं केलेल्या थोर सत्कृत्यांना नीचपणाची–दगलबाजीचीं कृत्यं लेखावीं लागतात ! त्यांच्या निर्मळ त्यागी वर्तनाला स्वार्थी आपमतलबी समजावं लागतं. त्यांची प्रत्येक कृति उलट्या डोळ्यांनीं पहावी लागते ! त्यांचा प्रत्येक शब्द उलट्या कानांनीं ऐकावा लागतो ! आणि त्यांच्या मूर्तींची प्रतिमासुद्धां मनोभावानं पूजा करून पुनः उलटी फिरवून ठेवावी लागते !

**राज० :** म्हणजे ! याचा अर्थ काय ?

**शाहू :** याचा अर्थ इतकाच, कीं असल्या उलट्या परिस्थितींत वाढलेला मी एक प्राणी आहें. राजकुंवर, माझं बोलणं तुला वेड्यासारखं वाटेल; पण शहाण्याला वेडा आणि वेड्याला शहाणा समजण्याचाच हा काळ आहे. खऱ्याला खोटं आणि खोट्याला खरं मानण्याचीच ही वेळ आहे. न जाणो मी खरा कुणीहि असलों तरी तूं मला तोतया समजणार नाहींस कशावरून ?

(**पद–४ राग** शंकरा मिश्र. **ताल** त्रिवट.)

**न दया जगिं या स्वकीयां । तिळहि नच माया । भजत**
**परकीयां ॥ धृ० ॥ व्याघ्रि प्रसवितां भक्षित स्वसुतां ।**
**स्वजन श्वानसम न्याय हाय हा ॥ १ ॥**

**राज० :** आपण जों जों असं बोलूं लागतां तों तों आपली हकीगत ऐकण्याची उत्सुकता जास्त जास्तच वाढत जाते. आपण कुणीका असाना ! ही राजकुंवर आपल्याला तोतया खास नाहीं म्हणणार.

**शाहू :** राजकुंवरसारखीं सर्वांचीं अंतःकरणं प्रेमळ आणि उदार असतील तर महाराष्ट्राचा उद्धार व्हायला उशीरच लागणार नाहीं.

**राज० :** आपण कुणीही असा, आपले आईबाप कुणीही असोत, आपला जन्म कोणत्याही कुळांत झालेला असो, आपण माझे प्राणदाते आहांत. माझ्या अब्रूचे–माझ्या कुंवरपणाचे आपण रक्षणकर्ते आहांत. आपले माझ्यावर अनंत उपकार आहेत.

(**पद—५ राग** देस. **ताल** एकताल)

**नाहि मोल भावा । दैवी ठेवा । सात जन्म घ्या सेवा ॥ धृ० ॥**
**अनलवदनिं वनमाला । धांवत हा घन आला ।**
**जलधारा सिंचोनी । वाहि सुमन स्वर्गीच्या देवा ॥ १ ॥**

**शाहू** : यांत माझे उपकार कसले? गोब्राह्मणांचं आणि अनाथांचं प्रतिपालन करणं हा आमचा छत्रपतींचा धर्मच आहे.

**राज०** : काय! आपण छत्रपति?

**शाहू** : होय, मी खरा छत्रपतीच आहे. महाराष्ट्रांत स्वराज्यसंस्थापना करणाऱ्या शिवछत्रपतीचा मी नातु! प्राण गेला तरी बेहेत्तर पण हिंदुधर्म सोडणार नाहीं, म्हणून अवरंगजेबाला त्याच्या तोंडावर बजावून, शत्रूच्या तरवारींनीं कापल्या जाणाऱ्या संभाजी महाराजांचा मी पुत्र! माझं खरं नांव शिवाजी; पण पातशाही दरबारांत शिवाजी नांवाला बहिष्कार असल्यामुळं मला शाहू असं नांव पडलं आहे.

**राज०** : काय आपण शाहू? आपण शाहू छत्रपति? आपण छत्रपति शाहू महाराज?

**शाहू** : होय मीच तो शाहू. राजकुंवर, तूं माझ्या मातृकुलांत जन्माला आलेली असून तुझे वडील कुंवरजीराजे माझे मामा होतात!

**राज०** : आपलं नातं इतकं उघड करून नको कांहीं सांगायला! शिर्क्यांच्या कुळांतल्या मुली भोंसल्याच्या घराण्यांत देण्याची वहिवाटच आहे. मला माहीत आहे सगळं!

**शाहू** : पण भोंसल्याच्या घराण्यांत आलेली शिर्क्यांची प्रत्येक कन्या महाराणी झालेली आहे!

**राज०** : मग आहेच झालेली. इतकं-जोर देऊन सांगायची जरूर नाहीं. मीही महाराणीच होईन!

**शाहू** : पण मी अद्याप राजा नाहीं!—

**राज०** : हं हं! या धोरणानं आपण चाललंय वाटतं!-आपण आतां राज्य मिळवणार कां राणी मिळवणार?

**शाहू** : दोन्हीही! राज्याकरितां राणी आणि राणीकरितां राज्य!

**राज०** : तें नाहीं मी विचारलं. कशाकरतां का कांहीं मिळवाना! पण मिळवा म्हणजे झालं!

**शाहू** : मग मिळवणारच! ताराऊ आईसाहेबांकडे मी आपलं राज्य मागायलाच चाललों आहें.

**राज०** : आणि ताराऊ आईसाहेब आपलं राज्य आपल्याला परत देतील?

**शाहू :** कां देणार नाहींत ? मी राज्याचा मालक, कांहीं काळ स्वतः राज्य केलेलं, शत्रूंनीं मला कैद करून नेलं, म्हणून सध्यां तें त्यांनीं सांभाळलं आहे ! मला परत आलेला पाहून, मोठ्या आनंदानं तें माझ्या स्वाधीन केल्यावांचून त्या राहणार नाहीत.

**राज० :** महाराज ! दुसऱ्याच्या ताब्यांत गेलेलीं राज्यं भिक्षुकाप्रमाणं मागून परत मिळत नसतात. शत्रूंनीं घशांत टाकलेलीं राज्यं त्यांना धाय धाय रडायला लावून–गळचेपी करूनच परत मिळवावीं लागतात !

**शाहू :** काय ? ताराऊ आईसाहेब माझ्या शत्रू ?

**राज० :** अद्याप नव्हत्या पण आतां होणार ! महाराज, सत्तेचा मोह कुणाला नाहीं ? आपल्याला, मला सर्वांना तो आहे. हातीं स्थिर झालेल्या सत्तेचं उदक आपल्या हातावर सोडून, संन्यास ग्रहण करण्याइतक्या ताराऊ आईसाहेब साधु नाहींत ! महाराज, आपण मोठ्या आशेनं–आनंदानं या महाराष्ट्रांत आलां आहांत; पण आईसाहेब एखाद्या आगांतुकाप्रमाणं आपलं चंबूगबाळं फेंकून दिल्यावांचून राहणार नाहींत ! गचांडी धरून आपल्याला देवडीबाहेर ढकलल्यां-वांचून त्या स्वस्थ बसणार नाहींत !

**शाहू :** मी आगांतुक नाहीं–मी भिक्षुकही नाहीं; हा शाहू खरा हक्कदार वारस आहे. ही छत्रपतीची शिक्काकट्यार माझा हक्क शाबीत करायला समर्थ आहे.

**राज० :** या कट्यारीनं काढलेल्या रक्ताचा शिक्का ज्यावेळीं आपल्या मस्तकावर दिसेल, त्याच वेळीं या छत्रपतीच्या शिक्काकट्यारीची दहशत आपल्या शत्रूंना बसेल. आपला जन्मसिद्ध हक्क युद्ध करूनच आपल्याला शाबित करावा लागेल. शिवाजी महाराजांच्या नातवाच्या अंगीं शिवछत्रपतीचा पराक्रम, त्यांचा मुत्सद्दी-पणा, त्यांचा उदारपणा आहे, अशी महाराष्ट्राची खात्री पटवा, कीं आपलं राज्य हात जोडून आपल्या पुढं उभं राहील.

**शाहू :** छत्रपतीच्या घराण्याचे गुण महाराष्ट्राला पटवल्यावांचून हा शाहू छत्रपतीच्या सिंहासनाला स्पर्श सुद्धां करणार नाहीं.–पण राजकुंवर, डंकेनौबतीच्या दणदणाटांत, भडक रक्ताचा सडा आणि प्रेताच्या पायघड्या यांच्यावरून पावलं टाकीत मी छत्रपतीच्या सिंहासनावर आरोहण करूं ? सामोपचाराचा–सलोख्याचा मार्ग सोडून, मी रक्तपाताचा रस्ता स्वीकारूं ? ताराऊ आईसाहेबांनीं माझी

विनंति नाकारली, शिष्टाई धाब्यावर बसविली तरी गोडीगुलाबीनं त्यांची समजूत घालून मी माझं राज्य परत मिळवीनच मिळवीन !

**राज० :** असंच जर असेल—या पायधरणीच्या मार्गावर आपला एवढा भरंवसा असेल, तर बेलाशक त्याच मार्गाचा अवलंब करा. आपण विनंती अर्ज धाडा, शिष्टाई करायला जा किंवा मुत्सद्दीपणाचे डावपेंच लढवा, आपल्या आड कोण येणार ? महाराज, या मुलीनं आपल्या राजकारणांत नसता लांडाकारभार करून, लहान तोंडीं मोठा घांस घेतला, याची तिला क्षमा करा.

**शाहू :** राजकुंवर, रागाऊं नकोस. या शाहूच्या राज्याची–त्याच्या प्रेमाची तूंच खरी स्वामिनी आहेस ! या गोदावरीच्या तीरावर, महाराष्ट्राच्या या नैसर्गिक सीमेवर तुझ्या रूपांत महाराष्ट्रराजलक्ष्मीचं मला पाणिग्रहण करूं दे.

( **पद—६ राग** कर्नाटकी. **ताल** त्रिवट. )

**ललना पाणिग्रहणा या जना। आलिंगना प्रियगना ॥ ध्रु० ॥**
**नजर गहिरि हनु गोजीरी। गाल लाल सजताहि संगरा।**
**व्हावा जाया जना या ॥ १ ॥**

**राज० :** छेः ! ही शिर्क्यांची राजकुंवर भिकेचं राज्यदान मागणाऱ्या फाकिराची पट्टराणी प्राण गेला तरी होणार नाहीं. ( राजकुंवर जाते. पडदा पडतो. )

---

## प्रवेश दुसरा



[ स्थळ : राजवाड्याच्या मागील बाग. कुंवरजी शिर्के व धनाजी येतात. ]

**धना० :** वाः, फारच विलक्षण हाकिगत ही ! शाहूमहाराज पातशहाच्या अटकेंतून सुटले ही बातमी आमच्या हेरांनी आम्हांला पूर्वीच कळाविली होती; पण गोदावरीच्या दक्षिण तीरावर येऊन त्यांनीं तळ दिला आणि परसोजी भोसले, चिमणाजी दामोदर यांच्यासारखे झुंझार सरदार त्यांना मिळाले, ही बातमी कांहीं आतांपर्यंत मला समजली नव्हती ! आणि ही तुमच्या मुलीबद्दलची गोष्ट तर एकाद्या कल्पित कथेसारखी दिसते.

**शिर्के०** : काल्पित कथा कसली ! त्या पोरीला वाटेंत पिशाच्चानं झपाटलं झालं ! कालपासून पंचाक्षरी देवऋषी बोलावून अंगारा धुपारा केला, कुलस्वामिनीला कळेही लावले, देवीला नवसही बोललों; पण कांहीं गुण नाहीं.

**धना०** : पण ही जर भूतबाधा म्हणावी तर राजकुंवरच्या बरोबर पन्नास परदेशी स्वार आणि एक देशी ब्राह्मण होता, असं आपण म्हणालांत त्याची वाट काय ?

**शिर्के** : अहो, ते स्वार आणि तो ब्राह्मण पिशाच्च्याप्रमाणं गेले कुठं ? कांहीं समजत नाहीं. माझी अक्कल तर मुळींच चालत नाहीं.

**धना०** : ते लोक एक शब्दसुद्धां न बोलतां चालते झाले म्हणतां ?

**शिर्के** : ते माझ्याजवळ कांहींच बोलले नाहींत. राजकुंवरला मात्र " महाराणी सरकार, रजा मंजूर. " असं म्हणून, खरोखरच जसे आपण ताराऊ आईसाहेबां-समोर मुजरे करतों, तसे मुजरे राजकुंवरला करून तिथल्या तिथें नाहींसे झाले.

**धना०** : आणि मग ?

**शिर्के** : मग काय ! तेव्हांपासून तिला हें असं वेड लागलं आहे.

**धना०** : तुम्हीं कांहीं म्हणा, ही पिशाच्चबाधा तुमच्या मुलीला झाली नसून दौलतीलाच ती होण्याचा संभव दिसतो. ते गुप्त झालेले स्वार वेष पालटून या शहरांत वावरत असतील आणि इथली बातमी हरघडी आपल्या मालकाला कळवीत असतील. मला अगोदर याचा बंदोबस्त केला पाहिजे. ही शाहूमहा-राजांसंबंधाची बातमी जर खरी असेल, तर— ( खंडोबल्लाळ येतो. )

**खंडो** : खरी अगदीं खरी ! सेनापति साहेब, आतांच शाहूमहाराजांकडून खलिता आला आहे; आणि सर्व सरदार दरकदारांचा विचार घेण्याकरितां दरबार भरवण्याबद्दल आईसाहेबांचा हुकूम आला आहे.

**शिर्के** : छेः छेः छेः ! ही पिशाच्चं बेफाम सुटलीं ! राजदरबारपर्यंत त्यांचा शिरकाव झाला ! पण माझ्या राजकुंवरचं आणि शिवाजीमहाराजाचं एकदां या वैशाखांत लग्न झालं, कीं आमची शिर्काबाई सगळीं भुतं पळवून लावील !

**खंडो०** : पण सरदार साहेब, या शाहूमहाराजांच्या खलित्याचा अगोदर काय निकाल होतो आहे तो पहा आणि मग—

**शिर्के** : मग काय ! दिलेला शब्द मी मागं घेऊं ? माझी राजकुंवर शिवाजी-महाराजांना दिली, म्हणून ताराऊ आईसाहेबांना दिलेलं वचन मी मागं घेऊं ? छेः ! प्राण गेला तरी बेहेत्तर; पण ही गोष्ट माझ्या हातून होणार नाहीं.

**शिवा०** : बरोबर ! बघा शहाणे ! आमचे चिटणीस किती हुशार आहेत ते ! आम्ही आतां त्यांना आमच्याबरोबर ठेवणार आहोंत. हा रंगराव आमचे पाय नीट रगडीत नाहीं. चिटणीस, माझे पाय जरा रगडा हो.

**खंडो०** : जी हुजूर. ( पाय रगडतो. ) ( स्वगत ) गाढवा ! हे तुझे पाय रगडीत नाहीं. शिवाजी महाराजांच्या गादीवर बसलेल्या त्यांच्या वंशजाचे रगडतो आहे.

**शिवा०** : शाबास ! पण हें शहाणे अजून उभे कां ? चिटणीस पाय रगडताहेत आणि तुम्ही कां उगीच उभे ? तुम्हांला नाहीं समजत ? कोण हो हे, चिटणीस ?

**खंडो०** : सरकारचे भावी श्वशूर !

**शिवा०** : शव शूर ते काय ? हे कुठले असूर ?

**शिर्के** : मी सरकारचा सासरा आहें.

**शिवा०** : होय का ? मग असे बसा कीं ! आमच्या जवळ बसा. बसा म्हणतों ना ! अहो सासरे, बसा ! आतां तुमच्या मुलीजवळ आमचं लग्न लागायंचं, तेव्हां तुम्हांला मान दिला पाहिजे ! बसा. ( शिर्के बसतो. ) हं उठा. ( उठतो. ) हं पुनः बसा. ( शिर्के बसतो. ) हं उठा. ( उठतो. ) आतां जरा माझ्याबरोबर धांवा. ( धांवतो. )

**शिर्के** : ( धांवतांना ) बाललीला आहे ! बाललीला आहे !

**शिवा०** : आतां जरा आंगठे धरून उभे रहा पाहूं. धरा आंगठे ! ऐकत नाहीं ? मग बघा आम्ही तुमच्या मुलीशीं लग्न करणार नाहीं. तुमची मुलगी तुमच्या सारखीच उर्मट असेल ! तुमची मुलगी किती आज्ञाधारक आहे, हें पहाण्या-करतांच मीं तुमची परीक्षा घेतली ! शितावरून भाताची परीक्षा, तशी बापा-वरून मुलीची परीक्षा ! पण काय हो, तुमच्या मुलीला तुमच्याप्रमाणंच मिशाकल्ले आहेत का ? आपल्याला नाहीं आवडणार मिशाळ बायको ! ह्या रंगरावाला मिशा असत्या तर मी याला उलटा टांगला असता !

**रंग०** : सरकार, पळा—पळा, आईसाहेब आल्या !

**शिवा०** : अग आईग ! चल पळ, ठोक धूम. ( शिवाजी व रंगराव जातात. )

**खंडो०** : काय सरदारसाहेब ! कसे काय आहेत जांवईबुवा ?

**शिर्के०** : बालवय आहे ! जरा थट्टेखोर स्वभाव आहे ! पण कसे झाले तरी महाराज आहेत !

**खंडो०** : मुलीचं सुख जरा पाहिलं पाहिजे, नाहीं ?

**शिर्के** : ताराऊ आईसाहेब आहेतच मुलीचं सुख पहायला !

**खंडो०** : ताराऊ आईसाहेबांबरोबर लग्न लावणार अहांत वाटतं मुलीचं ! पण हें पहा, आपणाला आईसाहेबांनीं बोलावलं आहे. बराच वेळ झाला, आपली वाट पहात असतील त्या.

**शिर्के** : हो तें मी विसरलोंच. ( शिर्के जातो, धनाजी येतो. )

**धना०** : काय चिटणीस !

**खंडो** : पाहिलातना चमत्कार ! कशी लहरी आहे स्वारी ! कां सेना घेऊन आलां नाहींत !

**धना०** : कशाला याला कापायला ! माझ्या मनांतून त्याच्या दोन श्रीमुखांत द्यायच्या होत्या !

**खंडो०** : पण दिल्या नाहींत हेंच चांगलं केलंत. सेनापतीसाहेब, ही वेळ मोठी महत्वाची आहे. यावेळीं आपल्या हातून होणारी प्रत्येक गोष्ट फारच विचारपूर्वक –पुढचं मागचं धोरण पाहून झाली पाहिजे. मोंगलांच्या कैदेंत मरणप्राय वेदना सोसून शाहूमहाराज ‘ माझं राज्य मला द्या ’ म्हणून विनंति करीत आहेत. इकडे आईसाहेब ही त्यांची विनंति लाथाडून देऊन आपणच राज्य हांकण्याचा हट्ट चालवीत आहेत.

**धना०** : चिटणीस, तुम्ही कांहींही विचार ठरविलेला असो, तुम्ही आईसाहेबांच्या पक्षाला चिकटून असा अगर शाहू महाराजांच्या बाजूला मिळा; मी एकच सांगतों, या मूर्ख आणि माथेफिरू राजाला धनी म्हणून मी आजपासून मुजरा-सुद्धां करणार नाहीं. आजच्या दरबारांत मी पाऊलसुद्धां टाकणार नाहीं.

( **पद ७—राग**–भूप–**ताल**–एकताल )

**अधम तिमिरिं मन रमतां । धवल चंद्र होई मलिन ।**
**दिन दिन । पडे झुराणिं बुडे तिमिरिं मरे जहरिं तरी ॥धृ०॥**
**त्यजिन विभव सदन सुता । वना वरिन जपा धरिन तपा**
**करिन । येइल जरि मजासि मरण । धिःकारिन नृपममता॥१॥**

**खंडो०** : सेनापतीसाहेब, सध्यांच्या आणीबाणीच्या प्रसंगीं तरी आपण शिपाई-गड्याचा बाणा सोडून, जरा मुत्सद्दीपणानं वागा. आपला निश्चय खऱ्या मराठ्या-ला शोभण्यासारखाच आहे; पण खलिता पाठवणारे खरे शाहू महाराज आहेत, का एकादा तोतया आहे, याबद्दल निकाल लागेपर्यंत आपण आपला निश्चय

ठाम करूं नये. आपण या खुळ्या शिवाजीच्या दरबारांत जाऊं नका—आपल्या थोरल्या छत्रपतीच्या दरबारांत जा; आपण या वेड्या शिवाजीला मुजरा करूं नका, त्या थोर महात्म्याच्या गादीला मुजरा करा; पण पुढं मात्र, मराठी साम्राज्याचं उदात्त ध्येय बाजूला सारून, आईसाहेबांच्या व्यक्तिविषयक शपथा घेण्याचा आग्रह पडला, तर मात्र मन पूर्ण स्वतंत्र ठेऊन गादीला स्वामिनिष्ट राहण्याची शपथ घ्यायला चुकूं नका. चला, ही शपथ कोणच्या शद्बांत घ्यायची ते मोजके शब्द आपण ठरवून ठेवूं. चला आपण जरा आमच्या वाड्यांत दरबारच्या वेळेपर्यंत या गोष्टीचा स्वस्थपणानं विचार करूं.

( खंडो बल्लाळ व धनाजी जाधव जातात, रंगराव घाबऱ्या घाबऱ्या येतो. )

**रंग०** : अहो चिटणीस, मला वांचवा हो वांचवा.—काय ? इथं कुणीच नाहीं ?

( शिवाजी येतो. )

**शिवा०** : कुठं आहे रंगराव ? गुलामाचं पोट पाहूं दे फाडून, आंत काय आहे तें.—( रंगरावास धरून ) कसा सांपडलास ? आतां कुठं पळशील ? आईसाहेब आल्या म्हणून मला खोटं सांगितलंस नाहीं ? आतां फोडतों तुझं पोट !

**रंग०** : धांवा धांवा, मेलों मेलों. ( संभाजी येतो )

**संभा०** : काय काय झालं ? रंगराव, काय झालं ?

**शिवा०** : कांहीं नाहीं रे संभ्या. दूर हो; नाहींतर रंगरावाचं पोट फोडायचं तें तुझंच फोडीन. ( रंगराव पळून जातो. )

**संभा०** : गप्प बसा दादामहाराज ! असा वेडेपणा काय करतां ?

**शिवा०** : मी वेडा ? कोण मला वेडा म्हणतो ? मी राजा आहें. राजा कधींच वेडा नसतो. वेडा किंवा गाढव नाहीं, असा जगांत एकच प्राणी आहे ! कोण सांग पाहूं ?

**संभा०** : कोण ?

**शिवा** : आम्हीं ! चल दूर हो; नाहींतर बघ कापतों तुझी मान ? ( संभाजीची मान कापायला धांवतो. )

**संभा** : ( तरवार उपसून ) मग हें घे तुला बक्षिस.

**शिवा०** : अरे बापरे ! राजद्रोह ! राजद्रोह ! राजाचा खून ! ( पळून जातो )

**संभा** : हा पळपुट्या ! पळ पळ ! तूं एवढा घोडा आणि माझ्यासारख्या एवढ्याशा पोरापुढं पळ काढतोस ? असले राजे म्हणजे लोकांचे जोडे खायच्याच लायकीचे ! ( संभाजी जातो. )

**( पद ८-राग-खमाज, ताल-त्रिवट. )**

**नृप हा दुबळा खुळा। अनाथां काळ गमला। पिसाट मर्कट। परि विधिनिर्मित राजयोग ॥ धृ०॥ मान मान्यता या नंदीला। बसतां उठतां हंसतां रुसतां जगतां मरतां। परि जन देतिल अंतिं लाथ ॥१॥**

---

## प्रवेश तिसरा

( **स्थळ**-शिर्क्यांच्या वाड्यांतील एक दालन. राजकुंवर येते. )

**राज०** : हें काय खूळ माजलं आहे सगळ्या घरांत ? मला भुतानं झपाटलं आहे, असा कसा प्रत्येकानं समज करून घेतला आहे ? जो देवऋषी येतो, तो अंगारा धुपारा करून 'बोल बोल' म्हणून मला एकसारखा त्रास देतो. जो मांत्रिक येतो, तो ताईतदोरे बांधून आणि छडीनं फटके देऊन मला जीव नको नकोसा करतो. काय करावं आतां ?-मला कोणत्या भुतानं पछाडलं आहे, हें त्यांना काय कळणार ? आणि या अंगाऱ्या धुपाऱ्यानं तरी तें कसं पळून जाणार ? त्या खुळ्या शिवाजीला मी वरीत नाहीं म्हणून म्हटलं यांत गैर तें काय केलं ? हे पहा, बाबा आलेच. पाहूं आतां काय करतात ते ? ( शिर्के येतो. ) कां बाबा !

**शिर्के** : हं जरा दूर उभी रहा. जरा हातपाय धुवून माझ्यासमोर बैस आणि हा अंगारा मी लावतों तो लावून घे.

**राज०** : बाबा, हें काय खूळ ? मी नाहीं जा हातपाय धुवून येत आणि अंगाराही लावून घेत.

**शिर्के** : हं-दूर-दूर ! अरे खवीसा, हीं सोंगं मला कळतात बरं ! माझ्या हातून अंगारा घेऊन तो विटाळायचा तुझ्या मनांत आहे नाहीं ? चल, सोड अंग माझ्या पोराचं, नाहींतर बघ तुला भाजीन.

**राज०** : बाबा ! आतां तुम्ही मला भाजणार कीं काय ? अहो, मला भाजूं नका.

**शिर्के** : नाहीं भाजीत, पण मुकाट्यानं हातपाय धुऊन ये.-कसा घाबरलास ! जा हातपाय धुऊन ये.

**राज०** : वेड्या बरोबर वेडं झाल्यावांचून गत्यंतर नाहीं ! ही मी हातपाय धुऊन येतें. ( जाते. )

**शिर्के** : जहांबाज पिशाच्च ! अंग सोडीत नाहीं म्हणतं. पहातों आतां कसं सोडीत नाहीं तें. पोरीच्या ऐन लग्नाच्या वेळीं बखेडा !

( राजकुंवर येते. )

**राज०** : ही पहा मी हातपाय धुऊन आलें.

**शिर्के** : पाहूं ? हं आलीस. ये अशी पुढं ! ( अंगाऱ्याची पुडी सोडून ) जय अंबे जगदंबे ! सगळी पीडा दूर कर. (अंगारा लावतो.) हं पाहूं तुझे डोळे आतां ? अरे अजून निघत नाहीं ! डोळ्यांत एक मोठा बोवा दिसतो ! हो–तो खवीसच ! जय जगदंबे ! ( पुन्हां अंगारा लावतो. )

**राज०** : बाबा, माझ्या डोळ्यांत तुम्ही पाहिल्यावर त्यांत तुमचा चेहरा दिसणारच. असं काय वेड्यासारखं करतां ?

**शिर्के** : बोल तुझं नांव काय ? बोल, असा हंसूं नकोस, बोल.

**राज०** : असं हो काय करतां बाबा ?

**शिर्के** : बोल तुझं नांव काय ?

**राज०** : माझं नांव काय ? माझं नांव राजकुंवर.

**शिर्के** : मग पाहूं पुन्हां डोळे ? नाहीं, अजून निवळले नाहींत. तो खवीस आहेच आंत. जय जगदंबे ! ( पुन्हां अंगारा लावतो. )

**राज०** : बाबा, मी भूत नाहीं–खवीस नाहीं –कांहीं नाहीं.

**शिर्के** : कांहीं नाहीं ? मग तूं कोण आहेस ?

**राज०** : मी आपली मुलगी राजकुंवर. मला खवीसाची बाधा नाहीं कीं कांहीं नाहीं. तुम्ही दुसरी कांहीं प्रचिती घ्या.

**शिर्के** : मग राम म्हण पाहूं.

**राज०** : किती वेळां म्हणूं ?

**शिर्के** : तीन वेळां म्हण.

**राज०** : राम राम राम. झालं आतां ?

**शिर्के** : मग ये अशी जवळ ! हं आतां कशी आलीस शुद्धिवर ? बरं आतां तूं साफ झालीस, कीं आम्ही तुझं लग्न करून टाकणार बरं ? हं लाजूं नकोस. आपल्या महाराजांशीं एकदां तुझं लग्न झालं म्हणजे सुटलों.

**राज०** : बाबा, कोण महाराज ? कोण आपले महाराज ?

**शिर्के** : हंः हंः हंः ! वेडी कुठली ! म्हणे कोण आपले महाराज ! अग आपले शिवाजी महाराज ?

**राज०** : पण कोणचे शिवाजी महाराज ?

**शिर्के** : कोणचे म्हणजे ? शिवाजी महाराज दोन का आहेत ?

**राज०** : नाहींत वाटतं ? एक संभाजी महाराजांचे पुत्र आणि दुसरा हा ताराऊ आईसाहेबांचा वेडा शिवाजी !

**शिर्के** : अग वेडे ! त्यांना अहो म्हण. तेच तर तुझे भावी पति ?

**राज०** : कोण तो खुळा ? तो वेडा ? तें माकड ?

**शिर्के** : अरे अरे, अरे अरे ! पुन्हां शिरलं पिशाच्च ! जय भवानी ! जगदंबे ! ( अंगारा पहातो ) संपला अंगारा सगळा ! पुन्हां आणला पाहिजे जाऊन.... आणूं द्या लवकर.

**राज०** : हं बाबा, अगोदर थांबा ! मी तुम्हांला निक्षून सांगतें, त्या वेड्याशीं माझं लग्न जमवूं नका; मी साफ लग्नाला उभी राहणार नाहीं. माझ्या मनाविरुद्ध जर त्या माकडाशीं माझं लग्न केलेंत तर मी जीव देईन.

**शिर्के** : अरे बापरे ! हा खवीस माझ्या पोरीचा बळी घेणार ? अरे पिशाच्चा ! बोल, तुला काय पाहिजे ? तुला जें पाहिजे तें देतों. माझ्या पोरीला नेऊं नकोस. हं बोल—नाहीं बोलत ? पुन्हां येऊं द्या अंगारा घेऊन.

( शिर्के जातो. )

**राज०** : आतां काय या मूर्खपणाला करावं ? मी जरी माझ्या अंगांत खवीस नाहीं, असं जीव तोडतोडून सांगितलं, तरी यांच्या अंगांतला मूर्खपणाचा हा खवीस यांना कसा सोडणार ? पण यांचा असा समज आहे, हेंच बरं आहे; नाहींतर एखादे वेळीं धरून बांधून माझं त्या मूर्खाशीं लग्न लावतील....शाहुमहाराजांना–पण शाहुमहाराज यावेळीं मोठ्या प्रसंगांत आहेत. या गोष्टी त्यांच्या कानावर घालून त्यांना आणखीं फिकिरींत मी कशाला घालूं ?– त्यांचा स्वभाव किती भोळा ! किती निर्मळ ! किती प्रेमळ ! त्यांनीं आपला प्रेमाचा हात माझ्या पुढं केला आणि मी वेडीनं तो झिडकारला ! शाहुमहाराजांना गमावून त्या वेड्या शिवाजीची पट्टराणी होण्यांत मला भूषण का आहे ?–झालें तर शाहू छत्रपतींचीच महाराणी होईन ! त्यांच्या प्रयत्नांत त्यांना मदत करीन ! आणि ते खरेखुरे छत्रपति आहेत, असं त्यांच्या शत्रूंनाही म्हणायला लावीन !

**वारिन चतुरा त्या वीरा नरवरा । वारुनि तिमिरा या ॥ धृ ॥**
**उदित नव उषा । विमल प्रकाशा । अर्पित रविराया ॥ १ ॥**

## प्रवेश चवथा.

( **स्थळ**—दरबार. प्रतिनिधि अष्टप्रधान बसले आहेत. भालदार ललकारतो. )

**भाल०** : श्री गोब्राह्मणप्रतिपालक क्षत्रियकुलावतंस श्री छत्रपति शिवाजी महाराज सिंहासनाधीश्वर. ( ताराऊ, शिवाजी व मानकरी येऊन बसतात. )

**प्रति०** : अष्टप्रधान, सर्व सरदार मानकरीहो, आजचा दरबार भरविण्याचा विशेष उद्देश हाच आहे कीं, कै. छत्रपति संभाजी महाराजांचे पुत्र शिवाजी महाराज मोंगलांच्या कैदखान्यांतून सुटून, शाहू हें नांव धारण करून, आपला मराठी गादीवरचा हक्क भांडण्याकरितां, मजल दरमजल करीत गोदावरीपर्यंत आले आहेत; आणि बरेच मराठे सरदार आपल्या बाजूला अनुकूल करून घेऊन, त्यांनीं आपल्या परमपूज्य ताराऊ आईसाहेबांकडे आपलं राज्य परत देण्याबद्दल विनंतिअर्ज पाठविला आहे. तो अर्ज आपणांस सविस्तर वाचून दाखविण्याचं कारण नाहीं. पण मुद्याची गोष्ट एवढीच आहे कीं...माझ्या आजोबानं संपादन केलेलं, माझ्या वडिलांनीं उपभोगलेलं आणि कांहीं काळ मी माझ्या बालवयांत शिरावर घेतलेलं माझं राज्य मला परत द्या,...अशी शाहूमहाराजांची मागणी आहे. ही मागणी न्यायाची आणि कायदेशीर आहे किंवा नाहीं, याचं स्वतः आईसाहेब विवेचन करणार आहेत, तरी सर्वांनीं सावधान असावं अशी दरबाराची आज्ञा आहे.

**खंडो०** : प्रतिनिधीसाहेब, आईसाहेबांची आज्ञा होण्यापूर्वी आपण तें शाहूमहाराजांकडून आलेलं पत्र सर्व दरबारी मंडळीला एकदा सविस्तर वाचून दाखवाल तर फार चांगलं होईल. आईसाहेबांचा हुकूम सर्वांना मान्यच आहे. परंतु मला वाटतं आतां आपण त्या पत्रासंबंधानं नुसता जो उल्लेख करून त्यांतलं सार एका वाक्यांत सांगितलंत, तेवढं राजकारणाच्या दृष्टीनं विचार करावयाला अगदीं अपुरं आहे.

**तारा०** : मुळींच अपुरं नाहीं. लांबलचक पत्र वाचून दाखवून दरबारचा वेळ मोडणं योग्य नाहीं. अधिकारावांचून राजकारणांत ढवळाढवळ करणं यासारखा मूर्खपणा नाहीं. चिटणीस, थोरल्या छत्रपति शिवाजी महाराजांपासून या गादीची आतांपर्यंत अशीच वहिवाट आहे कीं, राज्यसूत्र धारण करणारी व्यक्ति—मग तो पुरुष असो अगर स्त्री असो—जी आज्ञा करील तिच्या योग्यायोग्यतेबद्दल, बरेवाईट-

पणाबद्दल अगर न्यायान्यायाबद्दल मुळींच प्रश्न न करितां सर्वांनीं ती पाळलीच पाहिजे. अधिकाऱ्यांचा हुकूम अधिकाऱ्यानं पाळणं हा न्यायच आहे. तें पत्र साविस्तर वाचून दाखवून दरबारच्या अधिकाराची पिछेहाट होऊं देणं, मला रास्त दिसत नाहीं. शिवाय तें पत्र अगदीं खाजगी स्वरूपाचं आहे. त्याचा फक्त माझ्याशींच संबंध आहे. मी तें दरबारांत मांडूं इच्छित नाहीं. तुमच्या या भलत्याच अतिक्रमणानं दरबारी मंडळींचा गैरसमज होण्याचा मात्र संभव आहे.

**खंडो०** : आईसाहेब, मी गादीच्या हिताचे दोनच शब्द या वेळीं बोलतों याबद्दल क्षमा असावी. आईसाहेबांनीं छत्रपति थोरल्या शिवाजीमहाराजांकडून या गादीची काय वहिवाट आणि अधिकार आहेत, याबद्दल आतांच उद्गार काढले. त्या संबंधानं या गादीचा जुना नोकर या नात्यानं मी आईसाहेबांना थोडी विनंती करणार आहें. आईसाहेबांच्या म्हणण्याचा असा रोख दिसतो, कीं आम्हां दरबारी आणि मुत्सद्दी मंडळींना कोणाच्याही भानगडीच्या राजकारणांत आपलं मत स्पष्ट-पणानं मांडून मसलत करण्याचा अधिकार नाहीं. हा अधिकार फक्त राजाचा आहे! राजा म्हणेल ती पूर्व दिशा! राजा करील ती आज्ञा सर्वांना प्रमाण अस-लीच पाहिजे! पण मी आईसाहेबांना एवढीच विनंती करतों कीं, वस्तुस्थिति तशी नाहीं. थोरल्या शिवाजीमहाराजांनीं ज्यावेळीं अत्यंत परिश्रम करून मराठी दौलत गोळा केली, त्यावेळीं त्या अलौकिक लोकनायकाला कांहीं मुत्सद्दी मंडळींनीं राज्याभिषेक करून घेण्याविषयीं विनंती केली. त्यावेळीं सर्व फौज, सरदार, दरक-दार आणि प्रमुख लोक एकत्र जमवून शिवाजीमहाराज काय म्हणाले? मीच राजा पाहिजे, अशी जर लोकांची इच्छा असेल तरच मी राजपदावर आरोहण करीन!' श्रीशिवाजीमहाराजांचं बुद्धिसामर्थ्य, राजकारणपटुत्व आणि पराक्रम याबद्दल कोणालाही शंका नव्हती; पण त्यांनींसुद्धां राज्याधिकाराचा गाडा सुरळीत चालावा एवढ्याकरतां अष्टप्रधानांचं मंडळ निर्माण करून त्याच्या सल्लामसलतीनंच राजकारणाच्या प्रश्नाचा विचार करून घेतला आहे. लोकमताला याप्रमाणं स्वतः राज्यसंस्थापकानं मान देऊन त्याचा गौरव केलेला आहे.

**तारा०** : ही लोकमताला मान देण्याची ठिणगी-चिटणीस, यावेळीं-या भलत्याच वेळीं, या दरबारी मंडळींच्या गवताच्या गंजीवर टाकून तुम्ही निष्कारण आग लावतां आहांत. ही आग हां हां म्हणतां मोठमोठ्या शहरापासून तों लहान लहान खेड्यांपाड्यांपर्यंत पसरली कीं वाटेल तो लंगोट्यादेखील राज्यकर्त्यांच्या

कृतीवर टीका करून क्षणोक्षणीं त्यांचा हुकूम झुगारून देईल. लोकमताला मान देणारी ही नसती वावटळ बेफामपणानं दऱ्याखोऱ्यांत बोकाळूं लागली, म्हणजे जिकडे तिकडे असंतोषाची हवा भडकून परमेश्वराचं स्वयंभू सिंहासनही डळमळूं लागेल.

**खंडो०** : मग असं जर आहे, लोकमताचं एवढं जर महत्त्व आहे, तर आपण तरी तें असं धाब्यावर बसवणं चांगलं का ? श्रीसंभाजीमहाराजांनीं लोकमताला लाथाडून अनन्वित कृत्यं केलीं, त्यांचा परिणाम त्यांना कसा भोंवला हें सर्वांना श्रुतच आहे. राजाराममहाराजांनीं लोकमताला मान देऊन राज्यकारभार जर चार पुढारी मंडळींवर सोंपाविला नसता,तर मराठी राज्याचं पुनरुज्जीवन कधींच झालं नसतं ! प्रल्हाद निराजी, रामचंद्रपंत, धनाजी, संताजी यासारख्या कर्तबगार लोकनायकांनीं जर या साम्राज्याकरितां निःस्वार्थपणानं अविश्रांत श्रम घेतले नसते, तर आईसाहेब, आपल्याला आजच्याप्रमाणं आमच्यावर हुकमत चालविण्याचा प्रसंगच आला नसता !

**तारा०** : चिटणीस, आपण जरा अधिक वाहूं लागलां. आपल्या भाषणाचा ओघ जरा थांबवून धरा. लोकमताला योग्य मान द्यायला माझी ना नाहीं. आपणा सर्व मुत्सद्दी मंडळींची तशी इच्छा असेल, तर मी शाहूचं पत्र वाचून दाखवा, म्हणून प्रतिनिधींना हुकूम करतें. पण त्या पत्राच्या प्रत्येक शब्दांत मान-भावीपणा, कपट आणि स्वार्थ किती भरलेला आहे, हें कान उघडे ठेवून नटी ऐका. प्रतिनिधी, शाहूचं म्हणून आलेलं तें पत्र एकदां वाचून दाखवा.

**प्रति०** : आईसाहेब, तं पत्र खाजगी स्वरुपाचं असल्यामुळं त्याची दरबारांत जरूर लागणार नाहीं, असं वाटून तें इथं आणलं नाहीं.

**तारा०** : ठीक. नसलं आणलं तर त्याची कांहीं जरूर नाहीं. मी म्हणतें या मराठी राज्यावर शाहूचा मुळींच हक्क नाहीं. शिवाजी महाराजांनीं मिळविलेलं स्वराज्य संभाजी महाराजांनीं घालवलं ; आणि शाहूला अवरंगजेबानं कैद करून नेलं, त्याचवेळीं मराठ्यांचं जुनं राज्य लयाला गेलं ! माझ्या पतीनं मोठ्या चातुर्यानं—आपणां सर्व सरदारांच्या मदतीनं—हें नवीन राज्य संपादन केलं. माझे पति शिवाजमिहाराजाप्रमाणंच हल्लींच्या मराठी राज्याचे संस्थापक आहेत. हें राज्य आम्हीं स्वतःच्या बळावर—अकलेवर मिळवून त्याचा विस्तार केला आहे. हें राज्य मागण्याचा शाहूला मुळींच अधिकार नाहीं. आम्हीं आमच्या कर्तबगारीनं

आणि पराक्रमानं मिळविलेली दौलत आम्हीं काय म्हणून दुसऱ्याच्या हवालीं करावी ? आणि दुसऱ्याला–एका परक्या मनुष्याला–या तोतयाला तरी असला उन्मत्तपणाचा निरोप आमच्याकडे पाठविण्याचा काय अधिकार आहे ? मी पुन्हां सांगतें कीं, शिवाजीमहाराजांनीं स्थापलेलं मराठी राज्य हें नव्हे. यावर शाहूचा वडीलपणाचा, वंशपरंपरेचा हक्कच नाहीं.

**धना०ः** आईसाहेब, असं म्हणणं योग्य नाहीं. मी शिवाजी महाराजांपासून गादीची सरदारकी भोगीत आहें. मराठी राज्याचा विस्तार आणि जोपासना करण्याचा कांहीं भाग मी शिरावर घेतलेला होता आणि आईसाहेबांना माझं हेंच सांगणं आहे, कीं शिवाजी महाराजांनीं स्थापलेलं राज्य हेंच आहे. वडील-पणाच्या नात्यानं शाहूमहाराजच याचे वारस आहेत. शाहूमहाराजांना पकडून नेल्यावर राजाराम महाराजांनीं राज्यारोहण केलं नाहीं. त्यांनीं मंचकारोहण केलं आणि आमरण शाहूमहाराजांच्या मुक्ततेकरतां खटपट केली; हाच पुरावा याला पुरेसा आहे. शास्त्राच्या दृष्टीनं शाहूमहाराजांचाच त्याच्यावर वडीलपणाचा हक्क आहे.

**तारा०** : सेनापतिसाहेब ! आपल्या सरळ शिपाईबाण्याप्रमाणं आपलं शास्त्रही सरळच आहे. हें राज्य थोरल्या शिवाजीमहाराजांनींच स्थापलेलं आहे असं जरी गृहित धरलं, तरी त्यावर शाहूचा हक्क चालत नाहीं. मोंगलांनीं बंदीवान करून नेल्यामुळं शाहूचा राज्यावरील हक्क गेलेला आहे. माझ्या पतिनं मंचकारोहण केलं असलं, तरी ते छत्रपति नांव धारण करूनच केलं होतं. त्यांच्या पश्चात् त्यांचे वडील पुत्र–हे आपणा सर्वांचे लाडके शिवाजीमहाराज या गादीवर बसले आहेत. अशा तऱ्हेनं दोन पिढ्या या गादीची सत्ता धाकट्या घराण्यांत आली असून, आणि ती सर्व महाराष्ट्रानं मान्य केली असतांना यावेळीं अवचित एखाद्या उपटसुंभानं मध्येंच उभं राहून राज्य बळकावूं पहाणं म्हणजे अन्याय आहे. शिवाय माझा ठाम समज झाला आहे, कीं ज्या धाडसी पुरुषानं हें पत्र लिहिलं आहे, तो थोरल्या महाराजांचा खरा नातू नसून तो तोतया असला पाहिजे; आणि त्याच्या मार्फत मराठ्यांची गादी घेऊन पातशाही सत्ता दक्षिणेंत स्थापन करण्याचा मोंगलांचा डाव असला पाहिजे. कांहीं मराठे सरदारही या तोतयाच्या भुलथापांना भुलून फसले आहेत. तरी आपण सर्व अष्टप्रधान आणि सरदार मानकऱ्यांनीं या गादीशीं स्वामिनिष्ठ राहण्याबद्दल शपथा घेतल्या पाहिजेत.

**खंडो०** : अशा शपथा घेण्याचं कांहीं कारण नाहीं. गादीचा कोणताही नोकर गादीशीं बेमान होणार नाहीं. आईसाहेब, या नुसत्या शाब्दिक शपथेचा आग्रह आपण सोडून द्या.

**तारा** : चिटणीस, या वेळची तुमची प्रत्येक वागणूक मला विपरीत वाटते. माझ्या बाळाच्या–या शिवाजीच्या वडिलांनीं या दौलतीकरितां किती कष्ट सोसले, किती यातना भोगल्या, कसल्या दिव्यांतून त्यांना जावं लागलं, हें मीं तुम्हांला सांगायला कां पाहिजे ? आपण सर्व याला साक्षी आहांच. त्यांच्या पश्चात या बालराजाकडून आणि माझ्यासारख्या अभागी स्त्रीकडून तुम्हीं सर्वांनीं राज्य-कारभार करून घेतलांत ! आणि आज ती स्त्री आणि तिचं अनाथ लेकरूं दुर्दैवाच्या भोंवऱ्यांत सांपडण्याची वेळ आली असतां, तिला आणि त्या अनाथ लेकराला त्या भोंवऱ्यांत सोडून देऊन, निष्ठुरपणानं आणि भीतीनं तुम्ही त्यांच्या-कडे पाठ फिरवूं नका. त्यांच्या या हांकेकडे दुर्लक्ष करूं नका. मी अधिकाराच्या भरांत तुमच्याशीं उन्मत्तपणानं बेपर्वाईनं वागलें असलें, तर तो माझा मूर्खपणा–वेडेपणा होता. मी जर कुणाच्या चुका काढून कुणाला त्रास दिला असेल तर ती माझी चूक होती. मी जर कुणाला अपराधी ठरवून शिक्षा केल्या असतील, तर तो माझा अपराध होता. प्रतिनिधी, ठेवा, या मराठ्यांच्या गादीवर या थोरल्या शिवछत्रपतीच्या गादीवर हात ठेवा, आणि अशी शपथ घ्या ‘ मी तुमच्याशीं स्वामिनिष्ठच राहीन ’ ! घ्या घ्या शपथ आणि माझ्या या खळबळ-णाऱ्या मनोवृत्तींना शांत करा.

**प्रति०** : मी या गादीवर हात ठेवून शपथ घेतों कीं, मरेपर्यंत मीं आपल्याशीं स्वामिनिष्ठच राहीन.

**तारा०** : घ्या, घ्या सर्व अष्टप्रधान सरदारहो, अशाच शपथा तुम्हीही घ्या. ( प्रत्येकजण प्रतिनिधीप्रमाणें शपथ घेतो. ) सेनापतिसाहेब, आपण एकदां हीच शपथ घ्या.

**धना०** : मी या छत्रपतींच्या गादीवर हात ठेवून अशी शपथ घेतों कीं, मी या गादीशीं मरेपर्यंत स्वामिनिष्ठच राहीन.

**तारा०** : चिटणीस, आतां फक्त तुमचीच शपथ राहिली आहे. तेवढी घ्या आणि या शुभप्रसंगाला जास्त शोभा आणा.



**शास्त्रु०**—हकीमजी मुसलमान आणि त्यांना तुम्हीं संध्या शिकवितां ? [पृष्ठ ३१]

**चिट०** : मी या थोरल्या शिवछत्रपतींच्या गादीवर हात ठेवून अशी शपथ घेतों कीं, मी या गादीची मरेपर्यंत एकनिष्ठपणानं सेवा करीन.

**तारा** : आजचा दिवस मोठा आनंदाचा आहे. या आनंदाप्रीत्यर्थ सर्व सरदार-दरकरदारांना जी खास मेजवानी होणार आहे, तिला सर्वांनीं या दरबारांतूनच परस्पर चलावं, असा सर्वांना आमचा आग्रह आहे.

**शिवा** : चला जेवायला मंडळी !

**भाल** : दरबार बरखास्त. आस्ते कदम निगा रखो महाराज !

( पडदा पडतो. )

## अंक १ ला समाप्त

*

*

# अंक २ रा.



## प्रवेश पहिला

( **स्थळ**–शाहूची छावणी–शुक्लजी व हकीमजी धुळपाटी घेऊन बसले आहेत ).

**शुक्ल०** : हं हकीमजी, पुढचा धडा घ्या लौकर.

**हकी०** : धडा ? ए धडा मायने क्या है ?

**शुक्ल०** : हे मायने बियने आतां सोडून द्या–तुम्हांला हजार वेळां सांगितलं, कीं यावनी बोली या मराठी राज्यांत बोलायची नाहीं; तरी तुमचे 'मायने' आणि 'आयने' आहेतच.

**हकी०** : पन् ए धडा म्हंजे क्या ? दस सेर क्या ?

**शुक्ल०** : ' क्या ' नाहीं बोलायचं –' काय ' म्हणायचं. धडा म्हणजे दहा शेर नाहीं; धडा म्हणजे पाठ. आतां पाठ नीट शिका नाहींतर पाठीवर छड्याच मिळतील.

**हकी०** : पंडतजी, माफ करो—

**शुक्ल०** : ' करो ' नव्हे ' करा ' म्हणा.–तुम्ही असे नाहीं शिकणार ! देऊं का घोडीवर ?

**हकी०** : पंडतजी, ए काम जरा छोडना देऊं. तुमी हिंदुस्तानी जानता, मीभी जानतो. तब् जरा हिंदुस्तानी बोलना करूं.

**शुक्ल०** : अन्न न मिळाल्यामुळं, पथ्य करणाऱ्या आजारी मनुष्याची ज्याप्रमाणं अन्नावर वासना जाते, त्याप्रमाणं हकीमजी, तुम्हांला आपली जन्मभाषा केव्हां बोलेन असं होऊन गेलं आहे. पण हें पहा, मी कांहीं आतां तुमच्याजवळ यावनी बोली बोलणार नाहीं.

**हकी०** : तुम् नको बोलूं. पन् मैं बोलूं ना ?

**शुक्ल०** : छत् , कायदा मोडतो. तुम्हांला मराठी भाषा बोलायला अवघड जाते, हें मला माहीत आहे. बोलतां न येणाऱ्या लहान मुलाला ज्याप्रमाणं आपले विचार व्यक्त करण्याची अडचण पडते, त्याप्रमाणंच तुम्हांलाही आपले विचार मराठींत मांडायला कठीण जातं. माझं असंच झालंना ? मी मूळचा दक्षिणी

ब्राह्मण; पण यावनी राज्यांत राहिल्यामुळं यावनी भाषा शिकावी लागली. माझे जसे यावनी भाषा शिकतांना हाल झाले, तसे तुमचे मराठी भाषा शिकतांना होत आहेत. मला जसे इतिहास, भूगोल, गणित, ज्योतिषशास्त्र हे सर्व विषय यावनी भाषेंत शिकावे लागले, तसे तुम्हांला आतां सर्व विषय मराठी भाषेंत शिकले पाहिजेत.

**हकी०** : पन् मला सब् विषय आते ना !

**शुक्ल०** : तुम्हांला सगळं कांहीं येत असेल, पण तें यावनींत येतं; मराठींत कुठं येतं ? तुम्हांला सगळे विषय मराठींतच आले पाहिजेत. या विषयांची परीक्षा इथं मराठींतच होत असते !

**हकी०** ; ए तो ज्युल्म है !

**शुक्ल०** : जुल्म असो की जबरदस्ती असो, आम्ही म्हणूं तसंच झालं पाहिजे. ज्यावेळीं या महाराष्ट्रांत यावनी राज्य होतं, त्यावेळीं आम्हां ब्राह्मणांना यावनी भाषेंतच सगळे विषय शिकावे लागले. त्यावेळीं हा द्राविडी प्राणायाम नको म्हणून आमच्या मोठमोठ्या पंडितांनीं प्रचंड सभा भरवून तक्रारी केल्या; पण यावनी सरकारांनीं तिकडे लक्षच दिलं नाहीं. तसंच आतां आम्ही मराठी राजे तुमच्या अर्जाकडे लक्षच देणार नाहीं.

**हकी०** : पन् मेरा दवा देनेका धंदा—

**शुक्ल०** : तो दवा देण्याचा धंदा तुम्ही सारं वैद्यक मराठींत शिकल्यावांचून तुम्हांला करतां यायचा नाहीं. जरी तुम्ही दिल्लीचे मोठे नामांकित हकीम असलां, तरी तुम्हांला आमच्या आयुर्वेदिक औषधपद्धतीचा अभ्यास करून त्यांत परीक्षा दिलीच पाहिजे.

**हकी०** : पन् एवढा खटपटका क्या काम है ? मै परीक्षा कैसी देऊं ? मैला मराठी लिपी कुठं आती है ?

**शुक्ल०** : तीच मी तुम्हांला लवकर शिका म्हणतोंना ? ही घ्या काडी, आणि लिहा या धुळपाटीवर. चला लिहा, श्रीगणेशायनमः लिहा.

**हकी०** : हिंदूच्या देवाचं नांव कैसं घ्येयचं ?

**शुक्ल०** : घेतलंच पाहिजे. आम्ही अल्ला म्हणतों ते ! लिहा, श्री–ग–णे–शा–य–न–मः ! ( हकीमजी उलटीकडून लिहितो तें वाचून ) मः नय शाणे गश्री ! अहो शहाणे ! हे उलटं काय लिहिलंत ! अशी डावीकडून सुरवात करा. यावनीच्या

उलट मराठी, हे ध्यानांत ठेवा. यावनी उजवीकडून डावीकडे–मराठी डावीकडून उजवीकडे. मराठी शेंडा तो यावनी बुडखा ! आणि यावनी शेवट तो मराठी प्रारंभ ! –आतांच पहा, तुमच्या यावनी सरकारांची हद्द संपली आणि मराठी राज्याची सुरवात झाली. यावनी सत्तेचा शेवट कीं मराठी राज्याचा प्रारंभ ! मराठी राज्याचा शेवट कीं यावनीचा प्रारंभ ! नीट ध्यानांत ठेवा. हं लिहा डावकिडून.

**हकी०** : ए लिखना बहुत कठीन लागते.

**शुक्ल०** : कांहीं कठीण नाही. जरा असे उलट बसा म्हणजे येईल बरोबर.— तसं नव्हे, उलट बसावयाचं म्हणजे अशी उपडी मांडी घालून बसायचं–हं अस्सं. तुम्ही भाषा लवकर शिकलां कीं तुम्हांला वैद्यकीची परीक्षा लवकर देतां येईल.

**हकी०** : पन् ए क्या नादान बात है. हमारे मुसलमानी दवा क्या दवा नहीं ?

**शुक्ल०** : छत् आम्ही मराठे त्याला दवा नाहीं म्हणणार. हें पहा, परीक्षा दिल्यावांचून कुणाला दवा देऊं नका; नाहींतर खटला होईल.

**हकी०** : लेकिन् महाराज तो हमारा दवा हमेश पीते है, और उन्की तबियतभी आछी रहती है.

**शुक्ल०** : तुम्ही पुनः यावनी बोलायला लागलांत ! महाराज तुमचा दवा घेऊन जरी त्यांची तब्येत उत्तम होत असली आणि अगदीं असाध्य रोग्यांना औषध देऊन जरीं तुम्ही त्यांना मृत्यूच्या दाढेंतून बाहेर काढीत असलांत, तरी तुम्हांला ही वैद्यकीची परीक्षा मराठींत दिल्यावांचून हा धंदा या राज्यांत करण्याची मनाईच आहे. हं चला वळवा अक्षर. ( जोत्याजी येतो. )

**जोत्या०** : काय शुक्लजी, पंतोजीचं काम चाललं आहे वाटतं ? तुमचा शिष्य कुठपर्यंत शिकला ?

**शुक्ल०** : आमचा शिष्य फार कोंवळा मुलगा पडला, तव्हां त्याची गति काय विचारतां ! डोक्यावर केसांचं मिसाळ नसल्यामुळं प्रत्येक गोष्ट डोक्यांत लवकर शिरते; पण तोंडावर दाढीमिशांचं रान गर्द माजून राहिल्याकारणानं कोणतीही गोष्ट मुखांत बसत नाहीं ! श्रीमुखांत दिली तरी केसांची गादी हाताच्या आणि गालाच्या मध्यें येतेच !

**जोत्या०** मोठमोठ्या लोकांच्या श्रीमुखांत द्यायची वेळ आली आहे. हकीमजीच्या श्रीमुखांत देतांना जशी त्यांच्या दाढीची गादी आड येते, तशी ताराऊ आईसाहेबांना चार हिताचे शब्द सांगण्याच्या आड ही मराठी राज्याची गादी येते.

**शुक्र०** : बरोबर आहे ! शहाणी माणसं जर सरळ मार्ग सोडून आडरानांत शिरूं लागलीं, तर त्यांचे कान तरी कुणी उपटावे ? थोर थोर माणसं जर लहान मुलांसारखी कृति करूं लागलीं, तर त्यांना अक्कल तरी कुणी शिकवावी ? हे हकीमजी जर आपला धडा वेळेवर करीनासे झाले, तर त्यांना शिक्षा तरी कोणती द्यावी ?

**हकी०** : पंडितजी, आपभी जरा मेरेपास अक्कल शिकनेकी तसदी लेवो.

**शुक्र०** : यावनी बोली बोलायची नाहीं. एकदां–दहादां–शंभरदां–हजारदां–लाखदां–कोटीदां सांगितलं पण तुमची खोड कांहीं जात नाहीं.

**जोत्या०** : शुक्रजी, जाऊं द्या तूर्त तें हकीमजींचं ! मी तुम्हांला हल्लींच्या घडामोडीसंबंधानं कांहीं सांगायला आलों आहें.

**शुक्र०** : राजकारणाच्या घडामोडी असतील तर जरा थांबा. हे हकीमजी माझे विद्यार्थी आहेत; आणि विद्यार्थ्यांनं राजकीय वादविवादाच्या वेळीं हजर राहतां कामा नये. हकीमजी ! चलो–भागो...पळो...! बंदी आहे तुम्हांला इथं हजर राहायची.

**जोत्या०** : या भलत्याच वेळीं कसल्या विद्यार्थ्यांना प्रतिबंध करण्याच्या गोष्टी ? लहानसहान विद्यार्थ्यांबद्दल एक असो, पण हकीमजीसारख्या साठ साठ वर्षांच्या विद्यार्थ्यांना कसले राजकारणाचे प्रतिबंध घालतां !–शुक्रजी, महाराजांचं चित्त स्वस्थ नाहीं.

**हकी०** : क्या ! महाराजकी तबियत बराबर नहीं ? क्या हुवा ?

**शुक्र०** : पहा, मराठी येत नाहीं, यामुळं कसा अर्थाचा अनर्थ करताहेत हे हकीमजी ! अहो 'महाराजका दिलको आराम नही' असं हे म्हणत आहेत. पण काय हो जोत्याजी ? महाराजांचं चित्त उद्विग्न व्हायला असं झालं तरी काय ?

**जोत्या०** : तेंच सांगतों; पण तुमच्या या गुरुशिष्याच्या शाळेला तूर्त सुटी द्या. ताराऊ आईसाहेबांकडून शाहूमहाराजांना निरोप आला आहे कीं 'तूं कोण, हें आम्हांला माहित नाहीं; तूं तोतया आहेस; आणि तुझं पारिपत्य करण्याकरतां आम्ही सैन्यही रवाना केलं आहे.'

**शुक्र०** : मग आतां युद्ध जुंपणार तर !

**जोत्या०** : होय; आणि म्हणून तर महाराजांचं मन अगदीं उद्विग्न झालं आहे. आपल्याला अशा तऱ्हेचं उत्तर येईल, असं त्यांच्या ध्यानींमनींहीं कधीं आलं

नव्हतं. यावेळीं शुक्लजी, तुम्ही जरा महाराजांना पुढच्या तयारीला लागण्याला हुरूप आणा. परसोजी भोंसल्याकडे जासूद रवाना केला आहे; ते येईपर्यंत महाराजांचं मन जरा उल्हासित करा.

**शुक्ल०** : खरंच या बातमीनं माझी विनोदशक्तीसुद्धां मध्येंच ठेंचाळून पडली ! या हकीमजीला थोडी तसदी दिल्यावांचून ती दुरुस्त व्हायची नाहीं. हे हकीमजी म्हणजे आमची विनोदाची पोतडी आहे. हिच्यामधून नजरबंदीनं किंवा हातचलाखीनं मी वाटेल तसा विनोद काढून देतों.

**जोत्या०** : मग घ्या आपली पोतडी बरोबर आणि चला महाराजांकडे.

**शुक्ल०** : ठीक, चला हकीमजी, चला महाराजांकडे. पण ते पहा महाराजच इकडे आले. ( शाहू येतो )

**शाहू०** : ( स्वगत ) मी तोतया अं ! स्वराज्यसंस्थापक छत्रपती शिवाजीमहाराजांचा नातू हा शाहू तोतया अं ! मी जर आज छत्रपतीच्या गादीवर असतों, माझं राज्य जर आज माझ्या हातांत असतं, तर मला तोतया म्हणायची कुणाची छाती होती ! सत्ताधाऱ्यानं वाटेल त्याला वाटेल तें म्हटलं तर त्याला कोण जाब विचारणार ? आईसाहेब ! आपण इतक्या उलट्या काळजाच्या असाल असं माझ्या स्वप्नांतही आलं नाहीं. मला वाटलं कीं, मी आपल्या दर्शनाला येत आहें, असं आनंदवृत्त नुसतं आपल्या कानावर गेलं तर मी केव्हां भेटेन, असं आपल्याला होऊन जाईल ! माझ्या मुखावरून आपला हात केव्हां फिरवीन असं आपल्याला वाटेल ! आणि ' बाळ, बरा आलास, हें तुझं राज्य तुझ्या पदरांत घे ' असे गोड शब्द मी केव्हां ऐकेन असं मलाही होऊन जाईल. पण काय ! ध्यानीं मनीं नाहीं असा हा हृदयाची खळबळ उडवणारा निरोप—अरेरे ! देवा ! माझ्या विचारांची गती जरा थांबवून धर. मी आपल्या खरेपणाबद्दल आईसाहेबांची खात्री कशी करून देऊं ? आईसाहेबांना राज्यलोभाच्या—सत्ताभिलाषाच्या पिशाच्चानं पछाडलं आहे. हें पिशाच्च मी कोणत्या मंत्रानं पिटाळून देऊं ?

**शुक्ल०** : ( हळु ) जोत्याजी, माझी पळी पंचपात्री ताह्मण घ्या इकडे.

**शाहू०** : ( स्वगत ) मी गादीचा खरा मालक आहें, हें राजकुंवरच्या सल्ल्याप्रमाणं तरवारीच्या धारेनं मी सिद्ध करून दाखवूं कां ? पण स्वकीयांवर तरवार ? शिवाजी महाराजांच्या गरीब बापड्या प्रजेवर तरवार ? या तरवारीच्या तीव्र वारांनीं मराठे वीरांच्या हृदयाच्या कणखर कातळांतून रक्ताचे झरे फुटून त्यांचा प्रचंड ओघ

चाहूं लागला तर महाराष्ट्राचा प्रलय व्हायला कितीसा वेळ लागणार ? असल्या प्रलयाचा सूत्रधार होणं मला शोभतं का ? शांततेचं-आनंदाचं साम्राज्य स्थापणाऱ्या या शाहूला हें शोभतं कां ? पण मी स्वस्थ बसलों, तरी आईसाहेब कशा मला स्वस्थ बसूं देतील ? त्यांनीं रवाना केलेलं सैन्य कसं चैन पडूं देईल ? त्यांच्या स्वार्थाच्या आड येणारा हा शत्रू त्या आपल्या डोळ्यांसमोर कसा वावरूं देतील ? ही राज्यप्राप्तीची आशाच माझ्या मनांत उत्पन्न झाली नसती तर ! स्वकीयांच्या रक्ताची आचमनं करणारा हा शाहू, शिवाजीमहाराजांच्या गादीवर बसायला योग्य नाहीं म्हणून सगळा महाराष्ट्र मला दोष देईल ! त्यापेक्षां या गोदावरीच्या तीरावर एक पर्णकुटिका बांधून, गंगेच्या पवित्र जलाचीं आचमनं करून, मन शांत केलेलं काय वाईट ?

( पद १० )

**स्वार्थी पसारा सारा जगीं या ।**
**रवि चंद्र तारा उडति त्या अमरा ॥ धृ० ॥**
**घनदाट अंधार पसरे निराशा ।**
**झुंझार वारा न जीवा निवारा ॥ १ ॥**

**शुक्ल०** : हं हकीमजी, घ्या आचमन. हं म्हणा, केशवायनमः, नारायणायनमः, माधवायनमः, गोविंदायनमः, हं डोळ्यांना पाणी लावा.

**शाहू** : हा काय प्रकार आहे ?

**शुक्ल०** : हं नाक धरा आणि प्राणायाम करा. (हकीमजी नाक धरतो)

**शाहू** : पंडितजी, हें काय चालवलं आहे ? तुम्ही ब्राम्हण-हकीमजी मुसलमान आणि त्यांना तुम्ही संध्या शिकवतां ?

**शुक्ल०** : होय महाराज, मी हकीमजींना संध्येची संथा देऊन राहिलों आहें. जरा पुरी करूं द्या ती, मग बोलेन सरकारशीं. हं हकीमजी म्हणा, 'आकाशात् पतितं तोयं यथा गच्छति सागरम्' ( इ० श्लोक म्हणतो व त्या प्रमाणें हकीमजीही म्हणतो. )

**शाहू** : ( हंसून ) पण शुक्लजी, मराठ्यांनीं संध्या केली तर ब्राह्मण अकांड-तांडव करतात आणि तुम्ही तर मुसलमानांनाही संध्या शिकवूं लागलांत ? संभाळा, ग्रामण्य होईल तुमच्यावर.

**शुक्र०** : ग्रामण्य काय म्हणून ? मी म्हणतों कलियुगांत ब्राह्मणच मुळीं नाहींत. आमच्यासारखे जे कांहीं हाताच्या बोटावर मोजण्याइतके आहेत, त्यांनीं जर हकीमजीसारख्या सोज्ज्वल धर्मनिष्ठ मुसलमानांना शिकवून या संध्येचा आणि वेदांचा प्रसार करून ठेवला नाहीं, तर ही संध्या नामशेष झाल्यावांचून रहाणार नाहीं ! यापुढं वेद यवन अध्यापकाकडूनच सर्व हिंदु शिकतील, असं भविष्य पुराणांत लिहिलेलंच आहे.

**शाहू** : पण त्या काळाला अवकाश आहे. हिंदु संध्या करीनासे होऊन कालांतरानं ती विसरून गेले म्हणजे या गोष्टी होणार आहेत. पण आज त्याची एवढी काय गरज ?

**शुक्र०** : गरज म्हणजे अशी. आपण आतां महाराष्ट्राचे प्रभु होणार. आपला जन्म मराठा कुळांत पण आपलं प्रतिपालन केलं यावनी पातशहानं; तेव्हां आपणांला दोन्ही धर्माबद्दल आदरच असणार. आपणाला स्नान करून संध्या करीत बसतांना जसं मी पाहिलं आहे, तसंच हातपाय धुऊन पातशहाबरोबर नमाझ पडतांनाही पाहिलं आहे. तेव्हां 'यथा राजा तथा प्रजा' या न्यायानं हिंदूंनीं संध्येबरोबर नमाझही पढला पाहिजे, आणि मुसलमानांनीं नमाझाबरोबर संध्याही केली पाहिजे. हं हकीमजी, आम्ही तुम्हांला संध्या शिकवतों आहोंतच; तुम्ही आम्हांला नमाझ पढवा.

**हकी०** : हं ? अच्छा.

**शुक्र०** : हा पहा, पंचा पुढं पसरून मी ढोंपरकुटी झालों. सांगा आतां 'या अल्ला इल्लिल्ला रसूल अल्ला' !

**शाहू** : शाबास शुक्रजी ! तुमच्यासारखे उदार मनाचे जर सर्व ब्राह्मण होतील, तर हिंदूंचे जातीजातींतील तंटे तर नाहींसे होतीलच; पण हिंदु-मुसलमानांतील तंटेहि अजिबात नाहींसे होतलि.

**शुक्र०** : याला महाराज, एकच उपाय आहे. दिल्लीपति अकबर ज्याप्रमाणं पैगंबर बनून हिंदुमुसलमानांचाच नव्हे, तर सगळ्या दुनियेंतल्या लोकांचा एक धर्म निर्माण करीत होता, त्याप्रमाणं आपण स्वतः शंकराचार्य बनून असा एक धर्म काढा, कीं त्यांत हिंदु, यवन, इराणी, दुराणी, फिरंगी सगळयांचा समावेश झाला पाहिजे. त्या धर्माला काय नांव द्यावयाचं तें मग ठरवूं. पण त्याची सुरुवात आजच्याच मुहूर्तावर करण्याकरतां—महाराज,—आपण जरा गंगेच्या तीरावर चला; म्हणजे हकीमजींची दाढीमिशी भादरून त्यांच्या मुंजीची तयारी करूं.

**हकी० :** चलो महाराज, ए पंडितजीकी सुन्ता करनेकी मै भी तयारी रखता हूं
( सर्व जातात. )

---

## प्रवेश दुसरा

( **स्थळ**—राजवाड्यांतील एक दालन. राजसबाई येते. )

**राजस० :** पुरे ग बाई पुरे या जाचण्या ! एखादी कजाग सासू आपल्या सुनेलाही इतका जाच करीत नसेल. एखादा जुलमी राजा आपल्या प्रजेचाही इतका छळ करीत नसेल. मी राजाराम महाराजांची आवडती राणी ! आणि ताराऊ ! तूं नावडती का होतीस ! पण माझा संभाजी शहाणा आणि तुझा शिवाजी वेडा म्हणून तूं मला पाण्यांत पहातेस ! घरांत फूट पडूं नये, थोरल्या महाराजांनीं स्थापन केलेल्या गादीचे आमच्या भाऊबंदकीमुळं तुकडे होऊं नयेत आणि शांततेंत कालक्रमणा करणाऱ्या या महाराष्ट्रांत धांगडधिंगा माजूं नये, म्हणून मी कितीही स्वस्थ बसलें तरी–ताराऊ ! तुझं समाधान होत नाहीं ना ? –देवा ! माझ्यामुळं माझ्या बाळाचे कोण हाल होत आहेत ! या वयांत त्याच्या गुणांची जर नीट जोपासना झाली नाहीं, त्याला योग्य शिक्षण मिळून त्याच्या कर्तृत्वाला वाव मिळाला नाहीं, तर त्याचं कसं होणार ?–पण ताराऊ ! लक्षांत ठेव, माझा बाळ सिंहाचा छावा आहे ! त्याचीं नखं तोडून त्याला उपाशीं ठेवून तूं कितीही आळवलंस, तरी वेळ येतांच तो आपल्या घराण्याचे गुण दाखविल्यावांचून राहाणार नाहीं.

( **पद—११ राग** पिलु **ताल** दीपचंदी. )

**किती वानूं छकुल्या बाळा । सूर्य उदयासि ना वेळा ॥ धृ० ॥**
**पंजर हा हरि तृण ना मुखीं घे । गजभालीं घाली घाला ॥ १ ॥**

( संभाजी येतो. )

**संभा० :** आई ! आई ! अग कुठं ग शोधूं तुला ?

**राजस० :** कायरे बाळ, असा धापा का टाकतो आहेस ? कुठून धांवत आलास ? हा पुडा कसला तुझ्या हातांत ?

**संभा० :** आई, हा बघ मला खाऊचा पुडा मिळाला ? बघ तर कसा गोड खाऊ आहे तो.

**राजस०** कुणी दिला तुला हा खाऊचा पुडा ? तुला कितीदां सांगितलं, कीं कुणी परक्या माणसानं खाऊ दिला तर तो खाऊंही नये आणि घेऊंही नये. खाल्ला नाहींसना यांतला खाऊ ? काय नेम ! कोण कोणत्या वेळीं कसा दावा साधील तो ! नाहींना खाल्लास यांतला खाऊ ?

**संभा०** : नाहीं, मी खाल्ला, पण आई, कसा खाल्ला तुला सांगूं ? मला काय तूं दादामहाराजांसारखा अगदीं वेडाच समजतेस ? मला एका परदेशी बोवाजीनं हा पुडा दिला. मी पुडा उघडून त्या बोवाजीला अगोदर खायला दिला थोडासा खाऊ; अन् मग कांहीं वेळानं मी खाल्ला. मी तसा नाहीं खाल्ला अगोदर हो.

**राजस०** : तें चांगलं केलंस. पण बाळ, एखाद्या परदेशी बोवाजीनं जर आपल्याला खाऊ किंवा कांहीं दिलं, तर तें घेऊं नये बरं. हे परदेशी लोक मोठे लुच्चे असतात ! दादामहाराजांत आणि तुझ्यांत तंटा लावून मधल्यामध्यें गादी उपटण्याचा त्यांचा डाव असतो !

**संभा०** : अरेच्या, तो कसाग आई ?

**राजस०** : हल्लीं किनई बाळ, तुझा चुलतभाऊ शाहू महाराज म्हणून आहे, त्याचं सोंग घेऊन एक परदेशी तोतया दक्षिणेंत आला आहे. ताराऊआईसाहेब त्याची दाद कांहीं लागूं देत नाहींत. तेव्हां आपल्यांत तंटे लागून वितुष्ट पडावं म्हणून तो तोतया शाहू सारखा धडपडतो आहे. त्यानं पुष्कळ परदेशी लोक निर-निराळे वेष देऊन आपल्या राज्यांत पाटवून दिले आहेत आणि संधी साधून तुला आणि दादामहाराजांला कोंकलत ठेवून गादी उपटण्याचा त्यानं बेत केला आहे.

**संभा०** : असं नाहीं ? मग हे उत्तरेकडचे परदेशी लोक मोठे लुच्चे आहेत म्हणायचे ? पण ताराऊआईसाहेब फार लुच्चा आहेत, असं तो बोवाजी म्हणत होता. मी म्हणतों, या लुच्चालुच्च्यांचं भांडण लावून आपणच जर गादी उपटली तर नाहीं का जमायचं ?

**राजस०** : बाळ, असं बोलूं नये. आपल्या नशिबीं जर गादी असेल तर ती आपल्याकडे चालत येईल. पण आपला मतलब साधत नाहीं, म्हणून परक्याला घरांत येऊन घराचा नाश करणं चांगलं नव्हे.

**सभा०** : मग गादी मिळेपर्यंत उगीच माशा मारीत बसायचं ? परवां दादामहा-राजांनीं वेडेचार केल्यापासून ताराऊ आईसाहेबांनीं माझी तलवार सुद्धां काढून घेतली. आई, तूंच सांग, माझी तलवारीची जर संवय गेली तर उद्यां वेळीं अ-

वेळीं मला तलवार कशी धरतां येईल ? दादामहाराजांवर हा तोतया चालून आला तर दादामहाराजांच्या बाजूनं मला त्याच्याशीं लढायला कसं येईल ?

**राजस० :** पण मी ताराऊआईसाहेबांना सांगून तुझी तलवार तुला देईन बरं.

**संभा०**—हं असं कर; नाहीं तर बघ तो परदेशी बोवाजी मला तलवार देणार आहे. तो म्हणाला, तुला तलवार बंदुक सारं कांहीं देईन; मी सांगतों असं कर. तुझ्या आईची आणि माझी भेट करीव.

**राजस०**—मग तूं काय म्हणालास त्याला ? हें बघ बाळ, त्यानं दिलेलं कांहीं घेऊंही नकोस आणि त्याला माझ्याकडे आणूंही नकोस. आपण निःशस्त्र असलों तरी योग्य मार्गानं आपली तरवार मागून घेऊं; आपण उपाशीं असलों तरी भिक्षा मागून आपण पोट भरूं; आपण धनहीन असलों तरी काबाडकष्ट करून श्रीमंत होऊं; पण ताराऊआईसाहेबांच्या शत्रूंना-आपल्या गादीच्या शत्रूंना मिळून आपल्याला ती मराठ्यांची गादी नको.

**संभा०**—पण आई, तो जर खरा शाहू असला, तर घेईना सबंध राज्य ! आपल्याला तो एक लहानशी जहागीर देऊन स्वतंत्र तरी करील.

**राजस०**—बाळ, काय हे तुझे विचार ? असले वेडे विचार अगदीं काढून टाक मनांतून. शाहूला गादी मिळाली तर तुला पुढं राज्याची आशाच नको. थोड्याशा जहागिरीकरतां तुझा सगळ्या राज्यावरचा हक्क तूं कां घालवतोस ? दादामहाराज तुझे सावत्र भाऊ; तुम्ही एका घरांतले आहांत. उद्यां दादामहाराजांचं कांहीं बरं वाईट झालं तर हें राज्य तुझंच आहे. पण एकदा का ही गादी शाहूच्या हातीं गेली तर तुला कसलीच आशा नको.

**संभा०**—असं आहे नाहीं ! मी म्हटलं आपलं शाहूला भेटावं आणि एक लहानशी जहागीर घेऊन स्वतंत्र तरी व्हावं. -इथं काय सगळीच चोरी ! तरवार घ्यायची चोरी ! बोलायची चोरी ! बाहेर जायची चोरी ! खेळायची चोरी ! असल्या चोरीनं साव सुद्धां चोर बनायचा !

**राजस०**—बाळ, परमेश्वर प्रत्येक गोष्ट आपल्या फायद्याकरितांच करीत असतो. येईल त्या स्थितींत समाधान मानण्यासारखं सुख नाहीं.

**संभा०**—आई, कसलं सुख आणि कसलं काय ! मला तर तुझी स्थिति पहावत नाहीं. ताराऊ आईसाहेब तुला नेहमीं टाकून बोलतात, त्यावेळीं घटकान् घटका तूं डोळ्यांतून टिपं गाळीत बसतेस ! माझ्या मनांत कांहीं कमजास्त आलं, तर

दिवसच्या दिवस तूं उसासे सोडीत बसतेस ! माझ्या आवडीचा एखादा पदार्थ मला न मिळाला, तर तूं आपल्याला शिव्याशाप घेऊं लागतेस ! आई, या स्थितींतून तुझी केव्हां मुक्तता करीन असं मला झालं आहे.

( **पद १२—राग** चांदणीकेदार **ताल** त्रिवट )

**बंड मी करिन खुला व्हाया । छळ नच नमविल मान तया**
**॥ धृ० ॥ भ्रमत मस्तकीं क्रोध अनावर । लव न मना डर ।**
**तुडविन बंदिस या** ॥ १ ॥

**राजस०**—पण बाळ, तूं अजून लहान आहेस. तूं चांगला मोठा झालास, तुला कळूं लागलं, तूं दादामहाराजापेक्षां शहाणा आहेस असं ताराऊ आईसाहेबांना दिसून आलं, म्हणजे त्या आपण होऊनच तुझी काळजी घेतील, तुझे लाड पुरवतील आणि तुला राजाही करतील. समजलास ? त्यांचं मन फारच प्रेमळ आहे, उदार आहे, धोरणी आहे. जा जरा बागेंत खेळ म्हणजे तुला बरं वाटेल. अरे पिलाजी ! पिलाजी ! ( एक हुजऱ्या येतो ) बाळमहाराजांना जरा बागेंत घेऊन जा. ( संभाजी व हुजऱ्या जातात. ) ( स्वगत ) हा मिठाईचा पुडा ! मतलबी कार्यसाधु लोक आपला डाव साधण्याकरतां तऱ्हेतऱ्हेचीं जाळीं पसरीत असतात !—या पुड्यांतली मिठाई किती मिठास, किती गोड आहे ! पण त्या गोडपणाच्या मजेबरोबर देणाराचं कडू अंतःकरण सूक्ष्म रूपानं खाणाऱ्याच्या हृदयाचा ताबा घेतं आणि आपल्या इच्छेप्रमाणं त्याच्याकडून कृति करवतं. परचक्राच्या वेळीं असले खाऊचे पुडे, तोफांच्या आणि बंदुकीच्या गोळ्यांपेक्षांही जास्त शिताफीनं शत्रूच्या सर्वस्वाचा नाश करतात ! शत्रूपक्षाकडून आलेला हा खाऊचा पुडा घरांतला घरभेद्या अचुक ओळखून काढतो हा कलीचा महिमा नाहीं तर काय ?

( **पद १३—राग** तिलककामोद **ताल** झपताल. )

**कलियुगिं या जगाला । अधोगति विनाशांत ।**
**यश त्या कुटिलां ॥ धृ० ॥**
**सुजना वनवास । सुर दास नवसास ।**
**नवल कलि देवास ना हरत ॥ १ ॥**

( जातो. )

---

## प्रवेश तिसरा.

( **स्थळ**–राजवाड्यांतील एक महाल. शिवाजी येतो. )

**शिवा०** : त्या दिवशीं त्या संभ्याची खोड मोडल्यापासून तो माझं काळं तोंड पहायला उभाच रहात नाहीं. रंगरावही कुठं पळून गेला तें कळत नाहीं. काय करावं करमत नाहीं आपल्याला हल्लीं! आईसाहेब म्हणाल्या, ‘ तुला बायको करून देतें!’ मी पुरुष, मला कशी बायको करणार ? पुरुषाची बायको कशी होणार ? आणि मग मला कुणाला देणार ? असं आम्ही त्यांना विचारलं; तेव्हां त्या म्हणाल्या, ‘ तुझं एका चांगल्या बायकोशीं लग्न करून देणार!’ हं: हं: हं: हं: ! पण माझ्या बायकोचं पुढं काय होणार ? माझं राज्य शाहू लुबाडणार म्हणतात; तशी माझी बायको नाहींना तो लुबाडणार ? शाहूनं माझं राज्य आणि बायको घेतल्यावर मी मोठमोठ्यानं रडेन. (छाती बडवून रडतो) हायरे, माझं राज्य गेलं! हायरे, माझी बायको गेली! हाय हाय! हाय हाय! ( धनाजी जाधव व खंडो बल्लाळ येतात.)

**खंडो०** : काय–काय झालं महाराज ?

**शिवा०** : हायरे माझं राज्य गेलं, हाय हाय! ( रडतो. )

**धना०** : चिटणीस, डोहाळे पडताहेत पुढचे बरं!

**खंडो०** : वेड्याचा बाजार आहे सगळा!

**धना०** : आणि हे वेड्याचे मुकुटमणी आमचे धनी!

**शिवा०** : हायरे, माझी राणी गेली! हाय हाय!

**धना०** : अपशकुनी गाढव! चला जाऊं आईसाहेबांकडे.

**खंडो०** : पण हें पहा, आईसाहेबांनीं आपलं ऐकलं आणि शाहूमहाराजांना सन्मानानं आणून राज्यकारभार त्यांच्या स्वाधीन केला तर ठीकच; नाहींपेक्षां ठरल्याप्रमाणं गादीची सेवा करायची.

**शिवा०** : हायरे माझं राज्यरे! हायरे माझी राणीरे! ( ताराऊ व शिर्के येतात. )

**तारा०** : हं हें काय ? यावेळीं तुम्ही असे आरडाल ओरडाल तर खरंच तुमचं राज्य जाईल! आणि तुमची राणी—

**शिवा०** : आमची राणी ? कुठं आहे आमची राणी ?

**तारा०** : शिर्के, पाहिलांत बाळ आपल्या राणीकरितां कसा उतावळा झाला आहे तो ? मी सांगितलं नाहीं, त्याचा स्वभाव मोठा प्रेमळ आहे ? तो दुसऱ्यासारखीं

दोन दोन चार चार लग्नं नाहीं करायचा! एकच लग्न करून तो आपल्या राणीला जिवापलीकडे जपेल.

**शिर्के०** : हंः हंः हंः हंः ! राजतेज आहे ! कुलस्वामिनी भवानीचा वर आहे ! काय कमी आहे !

**तारा०** : थोरल्या महाराजांचं देहावसान व्हायच्या पूर्वी त्यांच्या अंगांत भवानी मातेचा शेवटचा संचार झाला. त्यावेळीं त्यांनीं काय सांगितलं, ठाऊक आहे का शिर्के ? तुम्हांला माहित आहे का सेनापती ? या चिटणिसांना विचारा. देवीनं सांगितलं, ' संभाजी राज्य घालवील. ' इकडचं नांव घेऊन म्हटलं, ' तो कमवील पण पुढें शिव नामें राजा होईल तो दिल्ली अटकेपार राज्य करील ! ' सरदारसाहेब माझ्या बाळाचं नांव शिवाजीच आहे हो.

**खंडो०** : ( धनाजीस ) दिल्लीपर्यंत हेंच बाळ राज्य करणार !

**तारा०** : थोरल्या शिवाजी महाराजांचं सगळं आयुष्य दगदगींत गेलं. शांतपणानं चार घटका गादीचा उपभोग घ्यायला त्यांना सवडच मिळाली नाहीं; म्हणून माझ्या पोटीं जन्म घेऊन आपलं अवतारकार्य ते पुरं करीत आहेत !

**धना०** : चिटणीस, थोरल्या शिवाजी महाराजांचा अवतार या मूर्खाला म्हटलेलं मला कांहीं सहन होत नाहीं.

**खंडो०** : ( हळू ) हं जरा राग आवरून धरा; नाहीतर—

**तारा०** : बरं ! राजकुंवरजी, तब्येत अशी चमत्कारिक झाली आहे म्हणतां ? ती काय काय करते ?

**शिर्के०** : करीत कांहीं एक नाहीं; बडबडते मात्र विचित्र ! मी खात्रीनं सांगतों, ही पिशाचबाधा आहे.

**तारा०** : अहो, कसली घेऊन बसलांत पिशाच्चं ! त्या तोतया शाहूचं पिशाच्च या दक्षिणेंत आल्यापासून आमच्या राज्यांतल्या शेलक्याच लोकांना त्यानं पछाडलं आहे. पण त्याला गाडून टाकणारी मांत्रिक मी आहें म्हणावं. हें पहा, तुम्ही आतांच्या आतां राजकुंवरला इकडे घेऊन या.

**शिर्के** : पण आतां रात्र नाहीं का झाली ! उद्यां सकाळीं—

**तारा०** : छत् ! रात्रबित्र कांहीं नाहीं. आतांच्या आतां आणा तिला इकडे. मी तिचं काय वेड आहे तें काढून टाकतें.

**खंडो०** : ( स्वगत ) स्वतःच्या पोराचं वेड जिला निघत नाहीं, ती वेडी दुसऱ्याच्या पोरीचं वेड कसं काढणार ?

**तारा०** : मग जातां ना ? जा लवकर.

**शिवा०** : आईसाहेब, आम्ही जाऊं का आमच्या सासऱ्यांना पोचवायला ?

**तारा०** : जा बरं बाळ.

**शिवा०** : चला चला लवकर, जलदी चला. आस्ते कदम निगा रख्खो सासरे सरकार ! ( शिवाजी व शिर्के जातात. )

**तारा०** : काय चिटणीस,-सेनापति, शेवटीं काय ठरलं ? तोतयाच्या प्रकरणांत अखेर तुमची काय खात्री झाली ? मराठी राज्य घशांत टाकायला आलेला शाहू तोतयाच ना ?

**धना०** : नाहीं आईसाहेब, ते खरे शाहू महाराजच आहेत.

**तारा०** : काय शाहू ? खरा शाहू ? तोतया-शाहू ? चिटणीस, तुम्ही सांगा,-सेनापतींनीं कसला तरी अंमल केलेला असावा. तुम्ही सांगा, तो खोटा शाहूच आहेना ?

**खंडो०** : आईसाहेब, सेनापतींचं म्हणणं बरोबर आहे. आपल्या चरणांपाशीं राज्य मागण्याकरितां आलेली व्यक्ति शाहूमहाराजच आहे. कैलासवासी संभाजी महाराजांचे पुत्र आणि थोरल्या शिवाजी महाराजांचे पौत्र शाहूमहाराजच ते आहेत.

**तारा०** : अस्सं ! मग—

**खंडो०** : मग काय ! त्यांना सन्मानानं आणून राज्याभिषेक करावा.

**तारा०** : गप्प बसा चिटणीस. राज्याभिषेक होण्यापूर्वी त्याच्या रक्ताचा अभिषेक या धरणीमातेच्या मस्तकावर झाल्यावांचून राहणार नाहीं.

**धना०** : आईसाहेब, थोरल्या शिवाजी महाराजांच्या पुत्राचं रक्त मोंगलांच्या छावणींत पडतांच पातशाही दौलतीची धुळधाण झाली ! त्याच थोर पुरुषाच्या नातवाचं रक्त या महाराष्ट्रमातेच्या मस्तकावर पडतांच साऱ्या महाराष्ट्राचा प्रलय झाल्यावांचून राहील का ?

**तारा०** : महाराष्ट्राचा प्रलय झाला तरी पत्करेल पण दिल्लीच्या पातशाहाचा ताबेदार म्हणून आलेला पुरुष छत्रपतीच्या गादीवर कधींही बसणार नाहीं !

**खंडो०** : आईसाहेब, ही प्रतिज्ञा व्यर्थ आहे ! स्वार्थाचं जहाज तुफान दर्यातून इच्छित स्थळीं सुरक्षित कधींच पोहोंचत नाहीं. सत्याच्या खडकावर आदळून त्याचे तुकडे व्हायला उशीरच लागत नाहीं. शाहूमहाराजांचा या गादीवरील हक्क जन्मसिद्धच आहे. अचाट बुद्धिसामर्थ्य, अलौकिक पराक्रम आणि थोर अंतःकरण यांचा तिथं त्रिवेणीसंगम झाला आहे. आईसाहेब, शाहूमहाराज एकदां

की रणांत उभे राहिले कीं त्यांच्या समोर जाण्याची—त्यांच्या डोळ्याकडे पहाण्याचीही कुणाची हिंमत नाहीं. थोरल्या छत्रपतींनीं अंतकाळीं उच्चारलेली भविष्यवाणी शाहू महाराजांना अक्षरशः लागू पडते.

**तारा०** : चिटणीस, मला वाटतं तुम्ही आमच्या चिटणीशीचं काम सोडून शाहूच्या भाटाची जागा पत्करली आहे ! आपल्या मुखांत नाचणाऱ्या सरस्वतीचा नाच जरा पुरे करा; नाहींतर—

**खंडो०** : नाहींतर ! आईसाहेब, नाहींतर काय ? शाहू महाराजांचे गुणवर्णन करतांना जरी माझी जीभ छाटली गेली तरी ती योग्य कामीं खर्च झाल्याबद्दल मला आनंदच वाटेल !

**तारा०** : (स्वगत) यांना आतां चुचकारूनच घेतलं पाहिजे. (उघड) चिटणीस, छत्रपतींच्या घराण्यांतल्या पुरुषाबद्दल ही तुमची निष्ठा पाहून मला किती आनंद होत आहे म्हणून सांगूं ! तुमचं घराणंच पाहिल्या प्रतीचं स्वामिनिष्ठ ! ज्या पुरुषानं तुमच्या वाडवडिलांचा नायनाट केला, त्याच्याच पुत्राबद्दल काय हा तुमचा आदर ! माझ्या पतींनाही जिंजीच्या वेळीं बहुमोल मदत करून त्यांच्याकरितां तुम्हीं आपले प्राण धोक्यांत घातले आहेत ! चिटणीस, हा शिवाजी त्याच पुरुषाचा मुलगा आहे ! त्याच्या सुखाकरितां तुम्ही तसेच झटाल ना ?

**खंडो०** : अलबत् झटेन.

**तारा०** : अद्याप शाहू तुमचा राजा नाहीं. शिवाजीच तुमचा छत्रपति ! त्याचा हुकूम—त्याची आज्ञा तुम्ही अमान्य करणार ?

**खंडो०** :<br>**धना०** : } नाहीं, छत्रपतीचा कोणताही हुकूम आम्ही अमान्य करणार नाहीं.

**तारा०** : होय ना ? तर मग सेनापती, आजच्या आज कूच करून रणांगणावर शाहूला पहिली सलामी तुम्ही द्या. चिटणीस, संभाजी महाराजांबरोबर फिरंग्याशीं लढतांना जसा पराक्रम केलांत, तसाच पराक्रम याही वेळीं करा आणि चिटणीस घराण्याचं नांव गाजवा.

**खंडो०** : आईसाहेब, आमचा कसला पराक्रम ? कांहीं पराक्रम असलाच तर तो आमच्या लेखणीचा ! तो पराक्रम वाडवडिलांपासून आपल्याला दिसला आहे आणि पुढंही दिसेल. आईसाहेबांचा हुकूम झाला तर सेनापतिसाहेबांबरोबर जाईन आणि दरबारचा मुत्सद्दी म्हणून काम करून वेळोवेळीं दरबारच्या हिताची सल्लामसलत सुचवीन.



**तारा०**–हां, हें काय ! यावेळीं तुम्ही असे आरडाल ओरडाल तर खरच तुमचं राज्य जाईल ! [पृष्ठ ३७]

**तारा०** : आणखीं तें काय पाहिजे ? मी तुम्हांला खरोखरच सांगतें कीं, शाहू या छत्रपतीच्या गादीला लायकच नाहीं. वडील या नात्यानं मी त्याचा **हक्क** कबूल करतें; पण छत्रपतीच्या गादीवर बसणाऱ्या पुरुषावर जी जबाबदारी आहे, ती पार पाडण्याची धमक शाहूंत नाहीं. एक तर तो पातशहाच्या जनानखान्यांत वाढलेला मग त्याच्या अंगांत मराठ्यांचा बाणा कुठून येणार ? त्याचा सगळा काळ पारतंत्र्यांत गेलेला मग त्याच्या डोक्यांत स्वतंत्रतेचं महत्व कसं शिरणार ? भित्र्यांतला भित्रा, नामर्दातला नामर्द, मूर्खांतला मूर्ख असा राजा मराठ्यांच्या गादीवर काय कामाचा ?

**धना०** : आईसाहेब, कृपा करून शाहू महाराजांची निंदा तुम्ही आम्हांला ऐकवूं नका. अशा निंदेनं त्यांचे अवगुण दिसण्यापेक्षां, आपल्या अंतःकरणाचं भेसूर चित्रच आम्हांला दिसतं. शाहूमहाराजांच्या गुणांचं वर्णन करावं तेवढं थोडंच आहे !

(**पद—१४ राग** अडाणा **ताल** एकताल. )

**धरणि पदिं दणदण वाजे । राजयोगि रणा जात । अधि-**
**राज शाहु सजे ॥ धृ॥ हृदय गमे शांतिधाम । राजतेज**
**नुरवी भ्रम । मुखिं विलसत सदा जें ॥ १ ॥**

आईसाहेब ! आपल्या भाषणाला मराठ्यांच्या गादीच्या अभिमानाचा आपण कितीही बुरखा घातलात तरी त्यांतून आपला स्वार्थ डोकावल्यावांचून रहात नाहीं.

**तारा०** : स्वार्थ ? शिवाजी महाराजांच्या सुनेला स्वार्थाचं स्वप्नसुद्धां पडणार नाहीं ? गादीबद्दलच्या माझ्या कळकळीला तुम्ही स्वार्थ म्हणून नांव देण्याचा कितीही प्रयत्न केलांत तरी लोक सोन्याला लोखंड कधींच म्हणणार नाहींत ! सोनं तें सोनंच ! त्याला कितीही भट्टींत घाला—त्याच्यावर घणाचे कितीही घाव घाला—त्याची किंमत कधींही कमी व्हायची नाहीं ! त्याचा खरेपणा कायमच रहायचा !

**खंडो०** : पण हा वाद आतां कशाला ? आईसाहेब, आपणांला जशी गादीबद्दल कळकळ आहे तशीच आम्हांलाही आहे; आणि म्हणूनच यावेळीं आमचा जीव एवढा तळमळतो आहे; आपण राजमाता आहांत. राजाराम महाराजांच्या पश्चात् आपण स्वतःच सर्व कारभार पहातां आहांत. हुकूम झाला त्यावेळीं आम्हीही आपल्या सामर्थ्याप्रमाणं सेवा केली आहे. आईसाहेबांची मोहिमेवर जाण्याची आज्ञा झाली आहे; ठीक आहे. सेनापति, आतांच्या आतां डेरे हालवायचा हुकूम फौजेला द्या आणि आईसाहेबांना मुजरा करून कूच करा.

**तारा० :** जा यशस्वी व्हा.

**धना० :**<br>**खंडो० :** } जी हुकूम. ( धनाजी व खंडोबल्लाळ जातात. )

**तारा० :** ( स्वगत ) हे दोन पुरुष म्हणजे मराठी दौलतीचे दोन खांबच आहेत ! एकाची तलवार जितकी प्रखर आहे तितकीच दुसऱ्याची लेखणीही पाणीदार आहे ! शत्रूच्या घोड्यांनासुद्धां ज्याप्रमाणं पाण्यांत धनाजी दिसतो, त्याप्रमाणं त्यांच्या मुत्सद्यांना सुद्धां कागदावर खंडोबा दिसतो ! धनाजीची तरवार शत्रूच्या रक्तानं रणमैदानाच्या कागदावर मराठ्यांच्या शौर्याची कीर्ति लिहिते आणि खंडोबाची लेखणी जगाच्या इतिहासांत मराठ्याचं नांव अजरामर करते ! हे दोन पुरुष जर दौलतीच्या उलट झाले, तर ? तर काय ? दौलत बुडाली— अगदीं रसातळाला गेली यांत शंका नाहीं. राज्यकर्ता स्वतः सेनापति आणि राजकारणी असला म्हणजे तो केव्हांही परावलंबी नसतो. सेनापतित्वाची लक्ष्मी आणि राजकारणाची सरस्वती ज्या पुरुषाला वश आहेत, त्याचं भाग्य काय वर्णावं ! हे दोन पुरुष शाहूच्या पक्षाकडे केव्हां मिळतील याचा नेम नाहीं. राजकारणांत मी खंडोबाला दाद देणार नाहीं ! पण सेनापतित्वांत मी धनाजीवर वर्चस्व कसं मिळविणार ? मी आपल्या बुद्धिबलानं आतांपर्यंत या दोन घोड्यांच्या लगामा खेंचून ह्या मराठी राज्याचा रथ अनेक अडचणींतून हांकून नेला; पण यापुढं हे दोन्ही घोडे बेफाम होऊन मलाच खड्ड्यांत घालतील अशी भीति वाटते. खंडोबाची जागा मीच चालवीन; पण धनाजी—धनाजीची जागा कशी निभावणार ? कोण प्रतिनिधी ? ( प्रतिनिधी येतो. ) तुम्ही अगदीं वेळेवर आलांत ! शाहूवर स्वारी करण्याचा आतांच सेनापतींना हुकूम दिला आहे. चिटणीसही त्यांच्या बरोबरच जात आहेत. तर तुम्हीही तयारी करा. कां तें सांगायला नकोच ! लक्षांत आलं ना ?

**प्रति० :** आलं सरकार ! मी आपल्याला केव्हांपासून सांगतों आहें कीं, या जुन्या खोडांवर एवढं अवलंबून राहूं नये. नवीन होतकरू माणसांना उत्तेजन देऊन कामगिरी देत गेलं, तर थकलेलं घोडं बदलून गाडा चालू करायला वेळ लागत नाहीं.

**तारा० :** म्हणूनच आतांपर्यंत तुमच्या हुशारीवर लक्ष देऊन मी तुम्हांला प्रतिनिधीपदावर आणून ठेवलं ! प्रतिनिधीचा अधिकार राज्याच्या बरोबरीचा आहे आणि

या मोहिमेवर तुम्ही तो अधिकार पूर्णपणानं गाजवून धनाजी आणि खंडोबा या दोन खोंकडांना चांगले कह्यांत ठेवा.

**प्रति०** : सरकार ! त्यांबद्दल आपण काळजीच करूं नये.

**तारा०** मी एक अबला असून त्यांच्यावर हुकमत चालवतें म्हणून त्यांना वैषम्य वाटतं !

**प्रति०** : तें तर माझ्या केव्हांच ध्यानांत आलं आहे. स्त्रिया म्हणजे काय माणसं नव्हत ? स्त्रीची कर्तबगारी काय असते याचा अनुभव पुराणकालापासून पुरुषांना आला असून, आणि आतांही—आईसाहेब,—आपल्या सारख्या तेजस्वी स्त्रिया या पृथ्वीवर असून, पुरुषांचे डोळे उघडत नाहींत, याला काय म्हणावं ? आईसाहेब, आपण काळजी करूं नका, आपली पडेल ती बाजू सांवरून धरायला हा प्रतिनिधी तयार आहे.

**तारा०** : तर मग चला, एकदम स्वारीवर निघा; आणि जर कांहीं फंदफितुरी दिसली तर हे सेनापति आहेत, ते चिटणीस आहेत, याबद्दल मनांत कांहीं एक विचार न करतां फितुऱ्यांना एकदम कैद करा.

**प्रति०** : आईसाहेबांच्या हुकमांची बरोबर तामीली करीन.

**तारा०** : या तर मग. तुम्ही छत्रपतींचे प्रतिनिधी आहांत. तुमच्यावर आमची भिस्त आहे.

**प्रति०** : जी हुकूम ! ( प्रतिनिधी जातो. )

**तारा०** : मी अबला ! मी अबला ! असा भित्रेपणाचा विचार माझ्या मनांत कां बरं येऊं लागला ? सबलांना दुर्बल करणारे हे भ्याडपणाचे विचार—देवा ! माझ्या मनांतून हद्दपार कर. या स्वारींत जर माझे सारे एकनिष्ठ सेवक कापले गेले आणि शाहूचा जय झाला, तर विजयानं धुंद झालेला तो शाहू या ताराऊला कैद केल्यावांचून राहील का ? पण शाहू ! लक्षांत ठेव, ही ताराऊ एकादी सामान्य स्त्री नाहीं ! तुझ्या त्या राक्षसी बापानं ज्या माझ्या सासूबाईंना भिंतींत चिणलं, त्या सोयराबाईसारखी सात्विक स्त्री ही ताराऊ नाहीं ! मराठे वीरांचे मुडदे पाडीत, जनानखान्यांतल्या स्त्रियांना तुडवीत तुडवीत, तो शेफारलेला शाहू जर माझ्या समोर आला, तर ही ताराऊ आपली कट्यार अशी त्याच्या छातींत—( कट्यार उपसते तोंच शाहू येतो. ) कोण ? कोण तूं ? अशा अकल्पित वेळीं माझ्यासमोर येऊन उभा रहाणारा तूं कोण ?

**शाहू०** : मी शाहू !

**तारा०** : शाहू ?–छत् तूं शाहू नाहींस. महाप्रबळ विचारांनीं माझ्या नजरेसमोर उभी केलेली ही शाहूची छाया असेल ! जागृतावस्थेंतल्या स्वप्नसृष्टींत मी आपल्या कल्पनेनं काढलेली ही शाहूची प्रतिमा असेल !

**शाहू** : नव्हे आईसाहेब, नव्हे ! ही शाहूची छायाही नव्हे आणि त्याची प्रतिमाही नव्हे. हा प्रत्यक्ष शाहूच आपल्या समोर उभा आहे.

**तारा०** : छत् ! माझा विश्वासच बसत नाहीं. पातशहाच्या जनानखान्यांत–पारतंत्र्याच्या गुलामगिरींत वाढलेला भ्याड शाहू–तो तूं ? तूं शाहू नाहींस–सैतान आहेस !

**शाहू** : थोरले शिवाजी महाराज त्यांच्या शत्रूंना सैतानच वाटत; मग मी त्यांचा नातू त्यांच्याप्रमाणंच सैतान वाटलों तर नवल काय ? आईसाहेब ! सदिच्छेनं आणि सत्यपणानं सैतानाचाही शिव होतो. आपलं मन यावेळीं स्वार्थाच्या—राज्याभिलाषेच्या सैतानानं पछाडलं आहे, त्यामुळं मी आपल्याला सैतान दिसतों आहें !–पण आईसाहेब ! आपल्या हृदयांत सत्याचा सूर्योदय होऊं द्या, म्हणजे त्याच्या प्रकाशानं माझं शिवरूप आपल्या दृष्टोत्पत्तीस आल्यावांचून रहाणार नाहीं. रात्रीच्या अंधःकारांत जे वृक्ष काळयाकुट्ट राक्षसाप्रमाणं भेवडावतात, तेच दिवसाच्या उजेडांत देवदूताप्रमाणं आराम देतात.

**तारा०** : तूं शाहू ऐस, कीं सैतान ऐस; या कट्यारीचं टोंक तुझं खरं स्वरूप मला दाखविल्यावांचून रहाणार नाहीं ! ( कट्यार शाहूच्या छातीवर टेकते. )

**शाहू** : आईसाहेब ! थांबलांत कां ? खुपसा ती कट्यार या हृदयांत ! म्हणजे ताराऊ आईसाहेबांबद्दल तिथं किती भक्ति आहे, ती आपल्याला पहायला सांपडेल–! खुपसा–खुपसा ती कट्यार.

**तारा०** : तूं भ्याड नाहींस–मर्द आहेस ! पण तूं शिवाजीमहाराजांचा नातूच आहेस, अशी माझी खात्री झाल्यावांचून मी तुला शाहू म्हणणार नाहीं. आपल्या पूर्वजाचं ‘ शिवाजी ’ हें नांव टाकून तूं ‘ शाहू ’ हें मुसलमानी नांव घेतलंस, यावरूनच तुला हिंदुधर्माचा किती अभिमान आहे तो कळून आला.

**शाहू** : हिंदु आणि मुसलमान हा भेद थोरल्या शिवाजी महाराजांजवळ नव्हता आणि माझ्याजवळही नाहीं. मी समर्थांचा महाराष्ट्र धर्म जाणतों. त्यांत हिंदु, मुसलमान, इराणी दुराणी सर्व धर्मांचा समावेश होतो. या महाराष्ट्र धर्मांचा

समुद्र सर्व महाराष्ट्रभर पसरून त्याच्यावर देशभक्तीच्या पर्वतप्राय लाटा येत आहेत ! या लाटा दिल्लीच्या तक्तापर्यंत पोंचून पावन झाल्या, कीं त्यांचे तडाखे हिमाचलाला उखडून काढतील आणि महाराष्ट्रधर्माचा प्रसार करून, किन्नर खंडापर्यंत मराठ्यांचं साम्राज्य चिरंजीव करतील !-आईसाहेब, 'शाहू' या नांवांत त्याज्य असं काय आहे ?

**तारा०** : तें नांव मुसलमानी आहे, हेंच कारण त्याचा तिटकारा करायला पुरेसं आहे.

**शाहू** : आपण त्याचा जितका तिरस्कार करतां, तितकंच तें मला प्रिय आहे. मला जन्म जरी माझ्या मातेनं-येसूबाईनं दिला, तरी माझं पालनपोषण शहाजादी झेबुन्निसेनं मातेपेक्षांही जास्त ममतेनं केलं आहे. माझीं हाडं-माझं रक्त अस्सल मराठ्याचं आहे; पण माझ्या शरिराला शोभा देणारं हें मांस मुसलमानाचं आहे.

**तारा०** : तुझ्या शरिराच्या मांसाच्या लेपानं तुझं मनही मुसलमानच बनलं आहे !

**शाहू** : माझं मन-माझं अंतःकरण अस्सल मराठ्याचं आहे ! पण मुसलमानी शिक्षणानं आणि परिस्थितीच्या प्रभावानं तें प्रगल्भ झालं आहे ! माझी महत्त्वाकांक्षा महाराष्ट्राच्या स्वराज्यापुरतीच-नद्या-पर्वतांच्या नैसर्गिक सीमांनीं संकुचित केलेली नाहीं; तर परमेश्वरानं मला राजकारणाच्या जास्त विस्तृत कल्पना शिकण्याकरतां बालपणींच पातशहाच्या संन्निध आणल्यामुळं, मुसलमानांबद्दल आकुंचित कल्पना आणि गैरसमज माझ्या मनांत उत्पन्नच झाले नाहींत. इतकंच नव्हे, तर मुसलमानांच्या सहकारित्वानं देशाचं कल्याण करून, मराठी साम्राज्य स्थापन करायचं अफाट ध्येय मी आपल्या दृष्टीसमोर ठेवलं आहे.

**तारा०** : तुझ्या या कल्पना बोलायला गोड आहेत पण व्यवहारांत आणायला अशक्य आहेत. मला तर त्या मुळींच मान्य नाहींत. शिवाजी महाराजांच्या वंशजानं मोंगलांची ताबेदारी पत्करून मराठ्यांवर सत्ता चालवणं मला असह्य वाटतं ! ही ताबेदारी तुझ्या स्वातंत्र्याच्या आड हरघडी आल्यावांचून रहाणार नाही ! ही ताबेदारी—

**शाहू** : पण या जगांत कोण कुणाचा ताबेदार नाहीं ? राजा झाला तरी राष्ट्राचा ताबेदारच आहे. ही ताबेदारी ओळखून जो राजा प्रजेची सेवा करतो तोच खरा राजा ! शिवाजी महाराजांनीं स्वराज्य स्थापलं आणि त्याचं दान समर्थ रामदासस्वामींच्या चरणीं वाहिलं आणि रामदासांचे ताबेदार म्हणूनच ते

राज्यकारभार पाहूं लागले. रामदासांचा भगवा झेंडा जरीपटक्याच्या आड कधींही आला नाहीं. रामदासांची ताबेदारी पत्करणाऱ्या पुरुषानेंच एका अडचणीच्या प्रसंगी मोंगल पातशाहाची ताबेदारी पत्करली होती, हें आपल्या लक्ष्यांत असेलच.

**तारा०** : पण त्यावेळीं प्रसंगच तसा बिनतोड होता. राजकारणाकरतां वेळ पडेल त्याप्रमाणं वागण्यांत कांहींच पाप नाहीं. तुझ्यावर तर तसा कोणताच प्रसंग आला नव्हता !

**शाहू०** : आईसाहेब, आपण शुद्धीवर आहांत ना ? या शाहूवर असा कोणताच प्रसंग आला नव्हता, अशी आपली खात्री आहे ना ? मी एक मराठा राजपुत्र बालपणींच स्वतःच्या राज्याला आणि भाऊबंदांना पारखा होऊन आपल्या घराण्याच्या आणि धर्माच्या कट्टया शत्रूच्या हातांत सांपडलेला हा माझ्यावर कांहींच प्रसंग नव्हे अं ? माझ्यासारखीं दुःखं, माझ्या इतके अपमान, माझ्या इतके दुर्दैवाचे तडाखे सोसले आहेत, असा एक तरी पुरुष या रियासतींत आहे का ? माझ्या बापाचा अत्यंत क्रूरपणानं वध करून, माझ्या स्वातंत्र्याचा अपहार करणाऱ्या त्या अवरंगजेबाच्या बंदिखान्यांत माझे आणि मातेचे दिवस सुखांत गेले असतील नाहीं ? मराठ्यांच्या हाडवैऱ्याच्या आबासाहेबांच्या आणि बाबांच्या दुष्मानाच्या क्रोधाग्नींत आम्हां मायलेकरांची आहुति, आमच्या एवढ्याशा सुद्धां नजरचुकीनं पडण्याला उशीर होता का ?

( **पद १५—राग** बहार. **ताल** एका. )

**नव नव येति लहरी असुरा त्या । कधीं बोध कधीं क्रोध ।**
**तोचि तात तो कृतांत । जहर वमत दुग्ध देत । वनवास**
**जीवा ॥ धृ० ॥ जन जाई त्या प्रपातिं । पदभर पथ भ्रांत-**
**मति । परि पदांत तोल नेत । जीव मोल द्याया ॥ १ ॥**

**तारा०** : पण तुम्हांला सोडवण्याकरतां आम्हीं थोडे का प्रयत्न केले ? तुझ्या काकांनी जिवावर उदार होऊन ब्रह्मपुरीला खास पातशहाच्या छावणीवर तुला सोडविण्याकरितां हल्ला केला ! तुझ्या काकांना त्यांच्या अंतकाळपर्यंत तुझं विस्मरण झालं नाहीं.

**शाहू** : काकांना माझं विस्मरण कसं होईल ? काकांचं प्रेम, काकांचा स्वार्थत्याग त्यांच्याबरोबरच लयाला गेला ! तो महात्मा जर आज हयात असता तर मला तोतया म्हणवून घेण्याचा प्रसंगच आला नसता ! अंतःकरणाची खूण अंतःकरणाला

ाटत असते ! माझं नांव मुसलमानी असो, माझा वेष मुसलमानी असो, किंवा ाझ्या चालीरीति मुसलमानी पडल्या असोत; मी छत्रपतीचा अंकुर आहें, ही गोष्ट खऱ्या मराठ्याच्या अंतःकरणांतून कधींही जाणार नाहीं. काकांनीं मरेपर्यंत नला सोडविण्याची खटपट केली; पण आईसाहेब, त्यानंतर माझ्या सुटकेकरतां आपण काय केलंत ?

**तारा०** :–असंख्य सैन्याचा चुराडा होऊन सुद्धां तुझी सुटका होत नाहीं असं देसून आलं, तेव्हां आम्ही तो प्रयत्न सोडून देऊन आमचं मन महाराष्ट्राच्या कल्याणाकडे लावलं यांत आम्ही गैर तें काय केलं ? व्यक्तीच्या मुक्ततेपेक्षां देशाच्या मुक्ततेचं महत्व जास्त आहे !

**शाहू** : खरं आहे. व्यक्तीच्या मुक्ततेपेक्षां देशाच्या मुक्ततेचं महत्त्व केव्हांही जास्तच आहे ! पण आईसाहेब, मी एक व्यक्ती अवरंगजेबाच्या कैदेंत नव्हतों. माझ्या रुपानं– माझ्या मातेच्या रुपानं–महाराष्ट्राचा प्राण–मराठ्यांची अब्रू-ातशहाच्या बंदीखान्यांत गतप्राण होऊन पडली होती ! महाराष्ट्राच्या प्राणाचा महाराष्ट्राच्या अब्रूचा अभिमान प्रत्येक मराठ्याच्या हृदयांत मूर्तिमंत उभा आहे ! आईसाहेब, आपण त्या अभिमानावर स्वार्थाचं कितीहि दडपण घातलंत, तरी त्या स्वार्थाचा पोकळपणा अनुभवाला येतांच, तो अभिमान मूर्त स्वरुपानं चहूंकडे बोकळूं लागेल ! आईसाहेब, आपण जाणूनबुजून माझ्याकडे दुर्लक्ष केलंत, हें मी तुमच्या तोंडावर तुम्हांला बजावतों.

**तारा०** : मग मीहि तुला बजावून सांगतें, हें राज्य माझं आहे. माझ्या पतीनं आपल्या तरवारीच्या जोरावर तें कमावलं आहे. तुझ्या वडिलांचं रक्त त्या करतां सांडलं नाहीं.

**शाहू** : माझ्या वडिलांचं रक्त सांडल्यामुळंच ह्या दौलतीची उभारणी झाली आहे. बाबांच्या वधानंतर पातशहानं आपल्या अमानुषपणाचं प्रदर्शन करून मराठ्यांना धाक दाखविण्याकरितां बाबांच्या रक्तानं माखलेला दुपट्टा मराठी सैन्यांत पाठवून दिला ! त्या दुपट्ट्याचा झेंडा रायगडच्या नगारखान्यावर आईच्या हुकमानं फडकूं लागतांच मराट्यांचं रक्त बेफामपणानं उसळया घेऊं लागलं ! आंधळ्यांना डोळे आले आणि मुक्यांना वाचा फुटली ! ह्या दुपट्ट्याच्या फडकण्याबरोबर काकांचं वक्तृत्व चमकूं लागलं ! चिटणिसांची लेखणी स्वैरे सुटली ! प्रल्हादपंतांचा मुत्सद्दीपणा उदयाला आला ! आणि धनाजी–संताजीच्या तरवारींना

स्वाभिमानाचं पाणी मिळून सर्व महाराष्ट्रभर मराठ्यांनीं थैमान घातला ! आई-साहेब ! माझ्या मातेचा कुंकुम तिलक त्या दुपट्टयानं पुसलेला ज्या वेळीं सर्व सरदारांनीं पाहिला त्या वेळीं सगळयांच्या हृदयांतून आलेला तो हुंदका डंक्या-प्रमाणं त्रिभुवनांत दुमदुमूं लागला ! त्या डंक्याच्या इशाऱ्याबरोबर सर्वांच्या तरवारी एकदम म्यानाच्या बाहेर पडल्या ! त्या डंक्याच्या इशाऱ्याबरोबर सर्वांच्या तरवारी एकदम म्यानाबाहेर पडल्या ! त्या डंक्याच्या दणदणाटाबरोबर मराठे वीरांनीं रायगडावरून एकदम उड्या घेतल्या ! अहाहा ! तो बाणा ! तो उत्साह ! ती वीरश्री ! तो प्रसंग ! आईसाहेब आपल्याही आठवणींतून गेला नसेल !

**तारा०** : होय, तो प्रसंग आतां माझ्या नजरेसमोर दिसतो आहे ! तो प्रसंग दृष्टीपुढं उभा राहिल्यामुळं माझ्या तोंडून शब्दच निघत नाहीं !

**शाहू** : पण मी खरा शाहू आहें अशी आपली खात्री झाली का ? माझ्या खरे-पणाबद्दल आपण सांगाल तें दिव्य करून मी आपली खात्री करून देईन.

**तारा०** : ( स्वगत ) आतां हा प्रसंग आटपावा हें बरं.

**शाहू** : आईसाहेब, आपण गप्प कां ? अजून आपली खात्री होत नाहीं ? या शाहूचा हक्क आपण अजून कबूल करीत नाहीं ?

**तारा०** : माझी चुकी झाली. तूं शाहू ऐस कीं शिवाजी ऐस; तुझा हक्क मी कबूल करतें. पण तुला ठाऊकच आहे, कीं मी एक स्त्री आहें. व्यवहाराच्या लहान सहान बाबतींत सुद्धां मला कारभारी मंडळीवर अवलंबून रहावं लागतं. मी जरी सत्ताधारी असलें तरी प्रधानमंडळाच्या मदतीनं मला हा कारभार चालवावा लागतो. सगळ्या महाराष्ट्रानं माझ्याजवळ ठेवलेली ठेव, उदईक कारभारी मंडळीचा सल्ला घेऊन, सर्व मराठे वीरांच्या समक्ष मी तुझ्या पदरांत टाकीन. तोंपर्यंत स्वस्थ ऐस. हा राजवाडा जरी नवीन असला तरी तो तुझाच आहे. हें तुझंच घर आहे. रात्र बरीच झाली आहे; आतां इथंच स्वस्थ-पणानं सकाळपर्यंत निद्रा घे आणि उदईक रजनीदेवीनं आपल्या बुद्धिवैभवानं चालविलेलं या पृथ्वीचं साम्राज्य भगवान् सूर्यनारायणानं हस्तगत केलं, कीं तूंही मराठ्यांच्या गादीवर आरोहण कर. मी नित्यक्रमाप्रमाणं देवाचं दर्शन घेतें आणि तुला शयनमंदिराचा मार्ग दाखविण्याकरितां परत येतें. ( ताराऊ जाते. )

**शाहू०** ( स्वगत ) शेवटीं ताराऊ आईसाहेबांचं आतडं कळवळलं ! त्यांची न्यायदृष्टी निवळली ! आणि स्वार्थत्यागानं उसळी घेतली ! कसं झालं तरी स्त्रीचं—

मातेचं हृदय तें,-त्याला पान्हा फुटल्यावांचून कसा राहील ? आज प्रत्यक्ष माझ्या आईला मी बालपणीं भेटल्याप्रमाणं मला वाटत आहे !

**( पद १३ राग**-जयजयवंती; **ताल**-त्रिवट )

**मंगल तें प्रिय धाम । या मना । ममता-निर्झर मातृहृदय तें । चुंबचुंबितां ये अंगाई ॥ धृ ॥ वदनसुमांजा चुंबन-मेघ । भान हिरवी । मोद माइना ॥ १ ॥**

माझी जन्मदात्री आई मला झेबुन्निसामाच्या माडीवर बसवून, 'बाई ! हा तुमचा मुलगा आहे, असं म्हणाली आणि झेबुन्निसामानं माझं मुख कुरवाळून माझं चुंबन घेतलं; तेव्हांपासून पातशहाच्या दगेबाज डावांतून माझ्या सख्या आईप्रमाणं तिनं माझं रक्षण केलं. माझ्या सुखाकरितां, माझ्या सुटकेकरतां झेबुन्निसामा कर्दनकाळ अवरंगजेबाबरोबर भांडल्या ! आणि मला पातशाही दौलतीचा हिस्सा द्यावा म्हणून तिनं पातशहाच्याजवळ हट्ट धरला ! अवरंगजेबाच्या मृत्यूनंतर तिनंच अजिमशहाला भीड घालून माझी मुक्तता केली !- थोर माणसांच्या मनाचा मोठेपणा स्वयंभू असतो. झेबुन्निसामाच्या अंतःकरणांत माझ्या जन्मदात्री आईप्रमाणंच मला खेळायला जागा मिळाली तशी या ताराऊ आईसाहेबांच्या हृदयांत-'नाहीं-नाहीं' असे शब्द माझ्या कानावर कुठून येत आहेत ?-अवरंगजेबाच्या दुष्टपणाच्या आगींतून जो जीव निसटला, तो या ताराऊ आईसाहेबांच्या-'दगा दगा' असा मला कोण इशारा देतो आहे ?-थोरल्या शिवाजी महाराजांना बिकट प्रसंगांतून निभावून नेण्याकरितां प्रत्यक्ष भवानी प्रगट होत असे. तशी-ही कोण ? भवानी ! ( राजकुंवर घाबऱ्या घाबऱ्या येते. )

**राज०**—महाराज, चला चला, इथं एक क्षणभरसुद्धां थांबूं नका.

**शाहू०**—थांबूं नका ! तें कां ?

**राज०**—महाराज, कां तें विचारूं नका. आतांच्या आतां जर आपण इथून गेलां नाहीं तर आपल्या जिवाला अपाय झाल्यावांचून राहणार नाहीं. ताराऊ आईसाहेबांनीं आपल्याला एकदम पकडायचा हुकूम दिला आहे. त्यांच्या तोंडचे शब्द ऐकतांच मी धांवत इकडं आलें. महाराज ! पळा पळा ! या-दगलबाजीच्या डावाला बळी पडूं नका.

**शाहू** : दगलबाजीच्या बागुलबोवाला छत्रपति शाहू भीक घालीत नसतो ! छे: ! मी इथून मुळींच हालणार नाहीं.

**राज० :** महाराज, माझ्यावर—या आपल्या दासीवर—या राजकुंवरवर जर आपलं प्रेम असेल, तर यावेळीं एकदम इथून चला. महाराज, आपल्या जिवावर मराठी साम्राज्याचा जीव अवलंबून आहे. हेकेखोरपणानं उगीच आगीत उडी घेऊं नका.

**शाहू :** राजकुंवर, तुझी वाणी विद्युल्लतेप्रमाणं माझ्या विचारसाम्राज्यांत वाटेल तसा धिंगाणा घालूं लागली आहे! प्रणयिनीची प्रेमळ आज्ञा उल्लंघन करणं प्रियकराच्या हातून कधींही होणार नाहीं. चल, चल या भुयारांतून आपण पार होऊं.

**राज० :** काय त्या भुयारांतून? त्या भुयाराच्या तोंडावर मारेकरी ठेवण्याबद्दल केव्हांच हुकूम झाला आहे.

**शाहू :** हा तुझा बातम्यांचा मारा मला असह्य झाला आहे. ताराऊ आईसाहेबांचं हृदय कोणत्या तत्त्वांनीं बनवलेलं आहे?

**राज० :** त्याचं पृथःकरण करण्याची ही वेळ नाहीं. प्रेमाच्या तत्त्वाचा तिथं मागमूसही नाहीं, हें मात्र मी सांगूं शकेन.

**शाहू :** ठीकच आहे; राजकुंवर अंतःकरण बनवितांना प्रेमाचं सगळंच भांडार खर्च झाल्यामुळं परमेश्वर भिकारी बनून त्याला तें शुष्क अंतःकरण निर्माण करावं लागलं!

**राज० :** पण या संकटांतून सुटण्याला कांहीं तरी युक्ति काढा—महाराज, आपण एकटेच शत्रूच्या घरांत पाऊल टाकून आपला घात करून घेतलात.

**शाहू :** तुझ्यासारखी देवता माझ्या सहाय्याला सज्ज झाल्यावर मला संकटाची कसली भीति? राजकुंवर, माझा शरीररक्षक जोत्याजी या चोरदाराच्या आड उभा आहे. जोत्याजी! ( जोत्याजी येतो. )

**जोत्या :** काय हुकूम!

**राज० :** महाराज, आपला पोषाख या जोत्याजींना घालून त्यांना इथं शाहू म्हणून राहूं द्या आणि आपण माझ्याबरोबरच्या माणसाचा वेष घेऊन माझ्याबरोबर चला.

**शाहू :** काय? या जोत्याजीला—ज्यानं मला अंगाखांद्यावर खेळवलं, मला ढाल-तरवार, भालाबरची यांत तरबेज करून धाडसाचीं कामं करायला शिकवलं, त्या माझ्या उपकारकर्त्याला या संकटांत बळी देऊन मी निघून जाऊं? छेः छेः! ही गोष्ट कालत्रयीं होणार नाहीं.

**जोत्या :** धन्याच्या प्राणावरून चाकरानं आपला प्राण ओवाळून टाकला तरच तो चाकर! महाराज, हा जीव आपल्याला वाहिलेला आहे. आपला पोषाख घालून मी इथं बसतों, आपण खुशाल या देवतेबरोबर निघून जा. माझ्या प्राणांबद्दल मुळींच काळजी करूं नका. शत्रूच्या हातावर तुरी देऊन मी उजाडलं नाहीं तोंच आपल्या सेवेला तयार आहें. महाराज, काढा पोषाख. ( शाहूचा पोषाख काढूं लागतो. )

**शाहू :** प्रेम सगळयांना ताबेदार करतें! जोत्याजी माझा सेवक, पण प्रेमामुळं मी त्याचा सेवक होऊन त्याची आज्ञा प्रमाण मानतों. ( जोत्याजीस स्वतःचा पोषाख घालतो. )

**राज०**—महाराज, चला माझ्या मागोमाग. आपल्याला असं येणं अपमानाचं वाटेल, हें मी जाणून आहें; पण प्रेमाच्या साम्राज्यांत मानापमानाचा प्रश्नच येत नाहीं ! प्रेमाच्या भाषेंत मानापमान हा शब्दच सांपडत नाहीं ! आणि प्रेमाच्या समाधींत मानापमानाचं स्वप्नही पडत नाहीं !

**शाहू**—चल तर मग. तुझ्या पावलावर पाऊल देऊन हा सप्तपदीचा विधि मला पूर्ण करूं दे.

**राज०**—ती पहा, माझी घोडी खिंकाळून आपल्याला ' जलदी चला ' म्हणून इशारा देत आहे.

**शाहू**—सप्तपदीच्या मागून वरातीचा समारंभ व्हायलाच हवा !

**राज०**—नीच दगलबाजांनो ! पहा पहा, तुमच्या दगलबाजीचं जाळं तोडून हा सिंहाचा छावा गर्जना करीत चालला पहा! ( शाहू व राजकुंवर जातात. ताराऊ, प्रतिनिधी व कांहीं सशस्त्र शिपाई येतात. )

**तारा०**—पकडा या हरामखोर शाहूला ! ( सर्व जोत्याजीभोंवतीं जमा होतात. जोत्याजी वेष टाकून देतो. सर्व आश्चर्यचकित होतात. ( पडदा पडतो. )

## अंक २ रा समाप्त

# अंक तिसरा.

## प्रवेश पहिला.

( **स्थळ**—राजवाड्यांतील एक दालन. शिवाजी व संभाजी येतात. )

**संभा०**—दादामहाराज, ऐक! मी तुला पायां पडून सांगतों, विनाकारण माझ्या वाटेस जाऊं नकोस.

**शिवा०**—जाऊं नकोस म्हणजे? तूं कोणरे आम्हांला सांगणार ? आम्ही राजे आहोंत! आम्हांला वाटेल तें करण्याचा अधिकार आहे. आम्ही तुला लाथेनं मारूं, तरवारीनं कापूं, बंदुकीनं गोळी घालूं, किंवा तोफेच्या तोंडीं देऊं! आमची मर्जी लागेल तर तुला हत्तीच्या पायींही देऊं! खबदार बडबड करशील तर! मुस्कटदाबी करीन ध्यानांत ठेव.

**संभा०**—म्हणजे बडबड करायची सुद्धां बंदी अं? तूं आमचा कितीही छळ केलास, तरी कुरकुर करायचीसुद्धां चोरी अं? कारण नसतांना आईमहाराजांनीं माझी तरवार काढून घेतली! काय तर म्हणे मी बंड करीन! मी असा निःशस्त्र झालों म्हणूनच तुझ्या या गमजा की नाहीं?

**शिवा०**—तूं माझ्यावर त्या दिवशीं कांरे तरवार उपसलीस? राजावर तरवार! हरामखोर कुठला!

**संभा०** : शिव्या दिल्यास म्हणून तूं कांहीं शूर ठरत नाहींस! मी लहान असलों तरी—

**शिवा०** : तरी कायरे? शहाण्याच्या कांद्या! तूं लहान—मी मोठा! माझी आई मोठी—तुझी लहान! मग मूर्खा, तुला समजत नाहीं? पड माझ्या पायां.

**संभा०** : नाहीं पडत. माझी तरवार देतोस?

**शिवा०** : मी तरवार देऊं? कुठली? कुणाची चोरून आणून देऊं का? अरे संभ्या, मी नांवाचा राजा आहे! आईमहाराज कारभार पहातात; माझ्या हातीं कांहीं नाहीं.

**संभा०** : वा: राजे!

**शिवा०** : तुला खरंच सांगतों, आम्ही असे गाढव ! एवढ्या सगळ्या राज्याचा आम्ही कसा बंदोबस्त पाहणार ? भालदार ललकारला तरी आमची छाती धडधडूं लागते ! आईसाहेब आहेत म्हणून ठीक. त्या मेल्या कीं आम्हांला कोण विचारतो ?

**संभा०** : आणि तूं मेल्यावर त्यांना तरी कोण विचारतो ? मग मीच राजा होणार ! आईसाहेबांना सांगून ठेव, आतां तुम्ही जितका त्रास आम्हांला देतां तितकाच मग आम्ही तुम्हांला देऊं ! ( राजसबाई येते )

**राजस०** : बाळ, असं बोलूं नये. आपला कितीही छळ झाला तरी आपण दुसऱ्याचा छळ करूं नये. आपणांला कुणी मारलं तरी आपण त्याला उलट मारूं नये.

**शिवा०** : ऐक, ऐक आणि जरा शहाणा हो. शीक धडा. हा पहा मी तुला बडवतों, खबरदार मला उलट मारशील तर ! ( संभाजीस मारतो. )

**संभा०** : आई ! आई ! आई ! ( रडतो )

**राजस०** : दादा महाराज, हें काय ? त्या गरीब पोराला कां मारतां ? त्यानं तुमचं काय केलं आहे ?

**शिवा०** : कांहीं केलं नसलं, म्हणजे मारूं नये, असं थोडंच आहे. मारायला कांहीं करावं लागतं वाटतं ? मी त्याला तुम्हीच सांगितलेला धडा शिकवितों आहें. ही घे थप्पड ! हं रडतोस काय ? राजांनीं मारलं म्हणून काय झालं ! ( मारतो. )

**संभा०** : आई, मला सोड ! या मूर्खाला–

**शिवा०** : मला मूर्ख म्हणतोस ? राजाला मूर्ख म्हणतोस ? वारे शाहाण्या ! तुला आतां फांशी देतों. ( संभाजीचे कान उपटतो )

**संभा०** : अग आईग !

**राजस०** : हं हं, हें काय दादामहाराज ? तें बिचारं पोर गप्प बसलं म्हणून उगीच कां त्याचा छळ करतां ? मी कांहीं बोलत नाहीं म्हणून कां मला सतावतां ? देवा ! आईच्या देखत तिच्या पोराला मार ! सिंहिणीच्यासमोर तिच्या पिलाचे हाल !

**संभा०** : आई, या हरामखोराच्या नरडीचा घोट घेतों.

( शिवाजीवर धांवतो. )

**शिवा०** : मेलों मेलों ! खून–खून ! ( ताराऊ व कांहीं लोक येतात. )

**तारा०** : बाळ, काय–काय झालं ?

**शिवा०** : हा संभ्या आणि ही अवदसा–दोघं माझा खून करीत होतीं. घ्या गुलामानों, लाथा–( संभाजीला व राजसबाईला लाथा मारतो. )

**राजस०** : बाई, पहा–पहा ! तुमच्या देखत हा चाललेला प्रकार पहा. हा आजचाच प्रसंग नाहीं. असे अपमान क्षणोक्षणीं आम्हांला सोसावे लागत आहेत. आपल्या कानावर घालावं तर आपण मनावर घेत नाहीं. तो लहान आहे म्हणतां ! आम्ही जरा रागं भरावं तर तीही चोरी ! देवा ! अशा जिण्यापेक्षां मरण बरं.

**तारा०** : बस बस झाला कांगावा ! तो बिचारा गरीब–वेडा–त्याला समजत नाहीं–कसं बोलावं तें कळत नाहीं, म्हणूनच त्याच्याविरुद्ध या तक्रारी कीं नाहीं ? पोर-बुद्धीनं त्यानं बाळ महाराजाला एखादी थप्पड मारली किंवा तुम्हांला पाय लावला तर तेवढंसुद्धां तुम्हांला सहन होत नाहीं ? तुम्हीं मायलेकरांनी त्याचा नुसता छळ मांडला आहे. या कार्ट्यानं परवां त्याच्यावर तरवार उपसली ! हें तुमचं शिक्षण ! आईबापांना आपल्या मुलांनीं कसं वागावं, हेंच उमजेनासं झालं आहे ! मुलांना शिक्षण देण्याऐवजीं त्यांच्या पालकांना शिक्षण देण्याची पाळी आली आहे ! या मुलांचा बंदोबस्त एव्हांपासूनच केला पाहिजे. कोण आहे रे तिकडे ? या संभाजीला इथून घेऊन जा. माईसाहेबांची आणि त्याची भेटसुद्धां आमच्या परवानगीवांचून होतां कामा नये. जा घेऊन त्याला. ( संभाजीला लोक नेऊं लागतात. )

**राजस०** : ( संभाजीला कवटाळून. ) नका बाई–नका त्याला माझ्यापासून दूर करूं ! नका–नका त्याची माझी ताटातूट करूं ! माझ्या जिवाचा जीव नका असा हिरावून नेऊं ! तो गेल्यावर मी काय करूं ? कुणाच्या मुखाकडे पाहून दिवस कंठूं ? कशीं हीं पदोपदीचीं दुःखं सोसूं ? बाळ, नकोरे तूं मला सोडून जाऊंस !

( **पद १७—राग.** धानी **ताल** केरवा. )

**कांरे राया हा मारिला विचवा जिवा ।**
**वद साहूं कशी या धाया ॥ धृ० ॥**
**प्रेम–झरा हा सुकला । ना मेघाद्रव आला ।**
**विधवा जिवा वनवास** ॥ १ ॥

**संभा०** : आई !

**तारा०** : कांहीं नको इतका हैदोस घालायला ! त्याला आम्ही नेतों आहोंत, म्हणजे काय ठार मारतों आहोंत कीं काय ? तो इथं राहून बिघडत चालला

आहे. त्याची काळजी आम्ही नाहीं घ्यायची तर कुणी घ्यायची ? चला बाळ महाराज, चला मुकाट्यानं.

**संभा** : आई ! आई ! तुझी काय अवस्था होईल ! आतां माझे अश्रु कोण ग पुशील ! मला मांडीवर घेऊन माझी कोण ग समजूत घालील !

**तारा०** : बाळ महाराज, तुमची आई कांहीं मेली नाहीं; कीं रानांत पडली नाही. चला तुम्ही या मंडळीबरोबर. तुम्हांला आम्हीं चांगले चांगले खेळ खेळायला देऊं बरं.

**संभा०** : आईसाहेब, मला खेळ नको, खाऊं नको, कांहीं नको. मला माझ्या आईची भेट द्या. तो जो खेळ आहे, तो जो खाऊ आहे, त्यापुढं इतर खेळाची आणि खाऊची प्रतिष्ठा नाहीं.

**राजस०** : बाई, तुम्ही सत्ताधीश आहांत–आम्ही दुर्बळ आहोंत. माझी एकच विनंती ऐका; माझ्या बाळाला माझ्यापासून दूर करूं नका ! आम्हांला सुखाच्या राजवाड्यांत ठेवूं नका. तुम्हांला वाटेल तर आम्हांला तुरुंगांत–अंधारकोठडींत किंवा क्रूर श्वापदं वास करीत असलेल्या एकाद्या गुहेंत कोंडून ठेवा; पण आम्हां दोघांना एका जागींच ठेवा. आम्हांला एकमेकांपासून दूर करूं नका.

**संभा०** : माझं हवंतर डोकं उडवा, पण माझ्या आईची आणि माझी ताटातूट करूं नका.

**राजस०** : बाई ! या मुलाची तुम्हांला दया येत नाही ना ? त्याच्या हुंदक्यांनी तुमच्या हृदयाला पाझर फुटत नाहीं ना ?

**तारा** : माईसाहेब, तुम्हांला काळवेळ कांहीं समजत नाहीं. यावेळी उलट तुम्ही त्याची समजूत घातली पाहिजे. गोडगोड बोलून त्याला वाटेला लावलं पाहिजे. या वयांत त्याच्या मनांत भलतेसलते विचार येऊं देणं चांगलं नाही. हल्लींचं राजकीय वातावरण किती पेटलं आहे, तुम्ही पहात नाहीं ? हें वातावरण शांत होईपर्यंत आम्ही त्याला तुमच्यापासून दूर करणार. त्याचे हाल होऊं नयेत आणि तुमच्यावरही आमचा राग होऊं नये अशी तुमची इच्छा असेल तर आतां मुकाट्यानं–सगळं दुःख गिळून–पाण्यानं डबडबलेले हे तुमचे डोळे पुसून, त्याला गोड शब्दांनीं या लोकांबरोबर जायला लावा.

**राजस०** : बाळ ! जा–जा–सुखांत रहा. या आईसाहेब आपली ताटातूट करीत आहेत, असं समजूं नकोस–आपलं दैव आपली ताटातूट करीत आहे ! दैव हें

फिरतं चक्र आहे ! कांहीं दिवसांनीं दुःखाचे फेरे सरून सुखाचे फेरे आल्यावांचून राहणार नाहींत. जा–जा. मी आईसाहेबांना सांगून रोज तुझी भेट घेईन.

**संभा०** : बरं तर. आई, ही दुःखाची कसोटी आहे ! दुःखाचा हा शेवटचा घाव आहे ! दुःखाचा शेवट म्हणजेच सुखाचा प्रारंभ ! या सुखाच्या प्रारंभाला मी आतां सुरुवात करायला जातों आहें. ( शिपाई संभाजीला नेतात. )

**शिवा०** : हुर्यो हुर्यो ! संभ्याची हुर्यो ! ( शिवाजी ओरडत जातो. )

**तारा०** : माईसाहेब, तुम्हांला इथं एकटं ठेवून चालायचं नाहीं. तुम्हीं आमच्याबरोबर चला. तुम्हांला एकटं ठेवलं, तर तुमच्या मनांत नाना प्रकारचे भयंकर विचार येऊन, एखादे वेळीं तुमच्या हातून अविचार व्हायचा संभव आहे. मी तुमच्या मुलाला तुमच्यापासून दूर केला तो त्याच्याच कल्याणाकरतां बरं ? माझ्याबद्दल मत्सर किंवा वैरभाव धरूं नका. घरांत फंदफितूर चालले आहेत, त्यांत सामील होऊं नका. त्यांत तुमचंच हित आहे. हें शाहूचं वावटळ एकदा निघून गेलं म्हणजे तुम्हांला आणि बाळ महाराजांना मी स्वतंत्र मुलूख तोडून देईन, समजलां ? पण तोंपर्यंत शांतपणानं राहून, आमच्या मनाला त्रास होईल, असं कोणचंही कृत्य करूं नका. चला आमच्याबरोबर. ( सर्व जातात. )

---

## प्रवेश दुसरा.

( **स्थळ**—शाहूची छावणी. शुक्लजी आणि हकीमजी फिरंग्यांच्या वेषांत येतात. )

**शुक्ल०** : मोस्ट हकीम ! अॅट मॅट पॉट गॅट ?

**हकी०** : जॅन्ट मॅन्ट कॅन्ट बॅन्ट !

**शुक्ल०** : लॉड मॉष्ट कोष्ट मिष्ट.

**हकी०** : देखो पंडतजी, ए फिरंगी भाषा जरा बंद करो. तुमको और हमको दोनोकोभि ए पागल बनाती है.

**शुक्ल०** : पॅट मॉट कॉट मेरी गॅट.

**हकी०** : पंडतजी, माफ करो. अपका दिल ए फिरंगी सैताननें पछाड दिया इसमे शक नही. जरा हिंदमें बोलो और मऱ्हाटीमें बात करो.

**शुक्ल** : ( पाय आपटून ) कुर्कुट ! बरबट !

**हकी०** : बाबा, ए बरबट बस करो. ( जोत्याजी येतो )

**शुक्ल०** : गॉड मारीन !

**जोत्या०** : हीं कुठलीं सोंगं बुवा !

**हकी०** : मोष्ट जोत्याजी, गॉड मारीन् !

**जोत्या०** : गाठ मारीन ? कसली गांठ मारीन ?

**शुक्ल०** : टुम फॉल कम णो.

**जोत्या०** : अरे बाबा हें बस करा. तिकडे चालली आहे लढाईची तयारी आणि तुमचं हें 'णो' काय घेऊन बसलात !

**शुक्ल०** : हडेर हूप !

**जोत्या०** : अरे बाबा, हे हाडी हूप काय ? इथं काय कुत्रीं आणि माकडं आहेत, ते हाडी आणि हूप करतां ?

**हकी०** : फोर फट् ! गोर घट्ट !

**जोत्या०** : बाबारे, हा तुमचा मारा बस्स करा. शाहुमहाराज युद्धाला निघाले आहेत. पोषाख घालून तयारसुद्धां झाले. मी तरवारी न्यायला आलों, तो हा बाजार !

**शुक्ल०** : टुमच्या बाजारांत आमी णाई यॅटे.

**हकी०** : जोत्याजी, ए पंडत तो पागल बन गये है. चलो आपका काम करो.

( शाहु युद्धाच्या पोषाखांत येतो. )

**शाहू** : जोत्याजी, किती वेळ झाला ? माझी तलवार आण लौकर—

( जोत्याजी जातो ) अरे ! हीं कुठलीं सोंगं ? हे फिरंगी वेष तुम्ही कुठून घातलेत ?

**शुक्ल०** : गॉड मारीन ! मोष्ट हकीम ! हं, महाराज—

**शाहू** : हा काय गोंधळ ?–शुक्लजी, ही थट्टा जरा बस करा. हीं सोंगं कशाला घेतलींत तुम्हीं ?

**शुक्ल०** : मोष्ट—

**शाहू** : हें पहा, मराठींत बोला. तुमचं तें मोष्ट कोष्ट आम्हांला कळत नाहीं.

**शुक्ल०** : महाराज, गुन्हा माफ करा. आपल्याकडे ते फिरंगी वकील आले होते, त्यांच्याबरोबर आम्हीं त्यांच्या उतरण्याच्या ठिकाणीं गेलों तेव्हां त्यांनीं आम्हांला शिरस्त्याप्रमाणं हे पोषाख दिले. आम्हांला कांहीं हे घालतां येईनात; तेव्हां त्यांच्या नोकरांनीं ते आमच्या अंगांत चढविले.

**शाहू** : वाः !

**शुक्र०** : महाराज, आपण त्या वकिलाला आपल्या तऱ्हेचा पोषाख नुसता हातांत दिलांत. त्यांच्या अंगांत कां चढवला नाहीं ? फिरंग्याच्या अंगांत आपला घेरदार अंगरखा, कमरेला शेला, डोकीवर मराठेशाही पगडी केव्हां पाहीन असं मला झालं आहे.

**शाहू** : इच्छा चांगली आहे; पण या फिरंगी लोकांत आणि तुमच्यांत फरक आहे तो हाच. हेच पहा, तुम्हीं त्यांचे कपडे मोठ्या आनंदानं अंगांत घातलेत. आतां हे जर तुम्हांला चांगले सोईस्कर वाटले, तर नेहमीं घालायला तुम्ही मुळींच अनमान करणार नाहीं. पण त्यांचं असं नाहीं. फिरंगी मोठे अभिमानी असतात. धर्माच्या, चालीरितीच्या किंवा कपड्यालत्त्याच्या बाबतींत ते आपला देशाभिमान विसरत नाहींत. त्यांच्यांत फंदफितुरी नाहीं आणि ते आपल्या देशबांधवांना आपल्या वर्तनानं कधींही कमीपणा आणीत नाहींत. ते निःस्वार्थी असून दुर्बळांना मदत करायला तत्पर असतात. आतां ते कशाकरितां इथं आले होते, तुम्हांला माहित आहे ?

**शुक्र०** : छेः महाराज, आम्हांला काय ठाऊक. कशा करतां आले होते ?

**शाहू** : त्यांनीं या आपल्या प्रकरणाबद्दल कुठून तरी हकीगत ऐकली. त्यांनीं ऐकलं, की साताऱ्चं सैन्य आमच्यावर चालून येत आहे; तेव्हां सैन्याची किंवा हरएक प्रकारची मदत मला करावी म्हणून त्यांचे हे वकील मुद्दाम माझ्या भेटीला आले होते.

**शुक्र०** : वाः फारच उत्तम ! मग काय त्यांचं सैन्य आपल्या मदतीला येणार तर !

**शाहू** : छेः मुळींच नाहीं. मी त्यांच्या या सहानुभूतीबद्दल त्यांचे आभार मानून त्यांची मदत नाकारली.

**शुक्र०** : महाराज, आपण मदत नाकारली ? ती कां ?

**शाहू** : आमचं हें भांडण आपसांतलं अर्थात् घरांतलं आहे; आणि घरांतल्या भांडणांत तिसरा कशाला ? आमच्याजवळ सैन्य कमी असलं, आमचा अगदीं पराभव होण्याचा संभव असला, तरी आमच्या घरच्या तंट्यांत तिसरे नकोत. काय नेम ! एखादे वेळीं असंही होण्याचा संभव असतो, कीं तंटा करणारे दोघे दोहींकडे राहून तंट्याचा विषय तिसराच उपटतो !

**शुक्र०** : असं व्हायची भीति आहे खरी.

**शाहू** : पण या फिरंगी लोकांपासून असं कांहीं व्हायची धास्तीच नाहीं. यांची मदत अगदीं निरपेक्ष असते. मदत होऊन आपला फायदा झाला तर ते एखादा मुलूखसुद्धां आपणाजवळ मागत नाहींत; किंवा चौथाई सरदेशमुखीसारखं वतनहि घेत नाहींत. त्यांच्या व्यापाऱ्यांना आपल्या राज्यांत व्यापार करण्याची परवानगी आपण दिली, कीं ते अगदीं खूष होतात ! तुम्ही जा, हे कपडे काढून टाका. हे तुम्हांला शोभत नाहींत. आपले नेहमींचे कपडेच तुम्ही घाला. ( शुक्रजी व हकीमजी जातात. जोत्याजी दोन तरवारी घेऊन येतो. )

**जोत्या०** : महाराज, या दोन तरवारींपैकीं कोणती तरवार आपण घेणार ? ही थोरल्या शिवाजी महाराजांची ‘ भवानी ’ ! आणि ही त्यांच्यापुढं दात वासून पडलेल्या अफजलखानाची ‘ फतिमा ’ !

**शाहू** : जोत्याजी, दैवाचा काय विचित्र खेळ आहे पहा ! दोन महापराक्रमी पुरुषांच्या या दोन तरवारी माझ्या बरोबरच पातशहाच्या हस्तगत होऊन, पातशाही शस्त्रागारांत आराम घेत पडल्या होत्या. माझ्या मुक्ततेच्या वेळीं पातशहाकडून त्या मला नजर करण्यांत आल्या. पांडवांची आज्ञातवासांतून मुक्तता होतांच, त्यांचीं शस्त्रं त्यांच्यापुढं उभीं राहिलीं; त्याप्रमाणं पातशहाच्या बंदीखान्यांतून माझी सुटका होतांच, मराठी गादीचीं हीं राजकीय शस्त्रं माझ्यापुढं चालून आलीं आहेत.

**जोत्या०** : ही फतिमा आपल्या कमरपट्यांत अडकवूं ?

**शाहू** : ही अफझलखानाची फतिमा ! या फतिमेनं आपल्या धन्याची पुष्कळ लढाईंत फत्ते केली असेल ! धर्मयुद्धाच्या वेळीं हिनं अफझलखानाच्या हाताला अचाट चलन देऊन विद्युल्लतेलाही खालीं पहायला लावलं असेल ! पण अधर्माच्या-दगलबाजीच्या प्रसंगींही आपला धनी आपल्याला उचलित आहे, असं पहातांच तीच खालीं पाहूं लागली ! या फतिमेला सत्यासत्याची चाड आहे. या शुभ प्रसंगीं मी हिला धारण केली असती; पण ही शत्रूची तरवार–मराठी राज्याच्या संस्थापकाच्या कट्टया दुष्मानाची तरवार–मी माझ्याच आप्तेष्टांवर चालवणार नाहीं ! जोत्याजी, नको मला ही तरवार. मी छत्रपतीच्या गादीवर चढल्यावर खऱ्या मराठ्यानं शत्रूच्या हातांतून जिंकून घेतलेली ही तरवार, त्या पुरुषाचं स्मारक म्हणून एखाद्या प्रमुख स्थळीं लटकवून देईन.

**जोत्या०** : मग महाराज, ही भवानी—

**शाहू** : ही भवानी ! थोरल्या महाराजांची भवानी ! अहाहा, नांव तरी किती स्फूर्तिदायक आहे ! हें नांव उच्चारतांच ज्याचं शरीर स्फुरण पावत नाहीं, तो अस्सल मराठाच नव्हे ! ही भवानी थोरल्या महाराजांच्या हातांत चमकूं लागतांच, मावळी सेना शत्रूच्या नरडीचा घोट घेण्याकरितां समुद्राच्या लाटाप्रमाणं उसळ्यां घेई ! ही भवानी माझ्यासमोर प्रगट होऊन मला काय सांगत आहे ? शिवाजी महाराजांचा पराक्रम, त्यांचा देशाभिमान, त्यांचं शुद्धाचरण, त्यांची धर्मनिष्ठा यांची आठवण ही भवानी मला करीत आहे. मराठी साम्राज्य, महाराष्ट्रधर्म, यांचं रहस्य ही भवानी मला समजून देत आहे.

**( पद १८—केरवा. )**

**माता वचन दे सदा देशा । तुडवी परकिय पाशा ॥**
**राष्ट्रधर्म नव जीव शिवाचा । ऐक्याविना न आशा ॥ धृ० ॥**
**बा महाराष्ट्रा ! जागा होई । ग्वाहि देत तुज माय भवानी ।**
**स्वातंत्र्या साधाया देशा । ऐक्याविना न आशा ॥ १ ॥**

भवानी ! तुला धारण करणारा पुरुष या भूमातेच्या पोटीं एकच झाला ! धन्य तो पुरुष आणि धन्य तूंही ! जोत्याजी, ही प्रखर भवानी तूं माझ्या नजरेआड कर. तिच्या तेजाकडे पाहण्याचंहि मला सामर्थ्य नाहीं. दुसरी एखादी, अगदीं कोरी करकरीत, कुणीही न वापरलेली अशीच तरवार यावेळीं मला आणून दे.

( जोत्याजी जातो. राजकुंवर तरवार घेऊन येते. )

**राज०** : महाराज, ही घ्यावी तरवार !

**शाहू** : कोण राजकुंवर ! यावेळीं तूं इथं ?

**राज०** : महाराज, आपल्याला एखादी नवी कोरी करकरीत तरवार हवी होती ना ?

**शाहू** : म्हणून तूं मूर्तिमंतच येऊन माझ्यासमोर उभी राहलीस वाटतं ? ही तरवार हातांत नाचावायाला मिळाल्यावर—

**राज०** : महाराज, आपण रणमैदानावर जायला निघाला आहांत ना ?

**शाहू** : होय आणि म्हणूनच वीरश्रीच्या त्या दोन्ही निवासस्थानांचीं चित्रं माझ्या दृष्टीसमोर उभीं राहिलीं.

**राज०** : त्या दोन चित्रांतलं एक चित्र सध्यांतरी पुसून टाका आणि ही तरवार हातांत घ्या.

**शाहू** : पण या शृंगारदेवतेला-या रसराणीला मुजरा केल्यावांचून तिच्या सेनापतीच्या हातांत मी कसा हात घालूं ? हिला सोडून तिच्याकडे माझी दृष्टीच

जात नाहीं, याला मी काय करूं ? या तरवारीकडे मात्र माझे नेत्रच काय, पण माझ्या शरीराचा रोमन्‌रोम ओढ घेऊं लागला आहे.

**राज०** : तर मग खरोखरच या राजकुंवरनं आपल्याला भुरळ घातली आहे. छत्रपतीपदाच्या प्राप्तीकरतां आपण रणांत उडी घेत असतांना, आपल्या मार्गांत आलेली ही सटवी अपशकुनीच म्हणायची ! फिरंगी ! महाराजांच्या कमरेला मिठी मारून आपण दोघी भगिनीभावानं राहूं असं मला वाटत होतं; पण एका म्यानांत दोन तरवारी राहूं शकंत नाहींत हेंच खरें ! मी दृष्टीआड झाल्यावांचून महाराज तुला जवळ घ्यायचे नाहींत. मी जातें आपली इथून ( जाऊं लागते. )

**शाहू** : कुठं चाललीस ?–वेडी नाहीं तर ! दे ती तरवार. कशी आहे ती तर पाहूं ?

**राज०** : महाराज, ही घ्यावी. ही तरवार अगदीं नवी आहे. फिरंगी वकिलांनीं भेट म्हणून आतांच आपल्याला अर्पण केलेली ही अगदीं नवी तरवार आहे. या तरवारीचा डौलही निराळ्या थाटाचा आहे; ही मूठही निराळ्या घाटाची आहे; आणि हें म्यानही निराळ्या धर्तीचं आहे. महाराज,. हीच तरवार यावेळीं आपण कमरेला लटकवावी.

**शाहू** : होय, हीच तरवार मी आज कमरेला लटकावीन ! आजच कां ? निरंतर हीच तरवार मी आपल्या हातांत नाचवीन. ( जोत्याजी येतो. ) प्रियेच्या प्रेमळ स्पर्शानं पावन झालेली ही तलवार युद्धांत मला यशच देईल. पूर्वकालीन योद्धे एखाद्या शस्त्राची किंवा अस्त्राची प्राप्ती करून घेण्याकरितां खडतर तपश्चर्या करून देवतांना प्रसन्न करून घेत असत. आज या फिरंगी तलवारीचा प्रसाद देण्याकरितां माझ्या हृदयाची देवता, माझी राजकुंवर मला प्रसन्न झाली आहे ! हा प्रसाद ग्रहण केल्यावांचून मी कसा राहीन ?

**राज०** : महाराज, ही आपली दासी आपल्या सेवेला तयार असतांना कमरेला तलवार लटकण्याचे श्रम आपणांला कशाला ? ( तलवार त्याच्या कमरेला अडकवून ) अहाहा ! महाराज, खरोखरच ही तल्वार आपल्याला इतकी कांहीं शोभते कीं कांही पुसूंच नये.

( **पद १९ राग** काफीघानी. **ताल** त्रिवट. )

**राजशाही वधु साजली । अधिर नारि आलिंगनकालीं ।**
**कंपित तनु परि । प्रणयें नच भ्याली ॥ धृ० ॥ रणिं रसाळ**
**ती तळपत रुधिर मुखीं जयशालि ॥ १ ॥**

**शाहू :** राजकुंवर ! वेडे राजकुंवर ! तूं किती उदार आहेस ! या फिरंगीनं माझ्या कमरेला कवटाळलेलं पाहून तुझ्या हृदयांत मत्सराचा अग्नि धुमसायला हवा होता; तुझ्या नेत्रांमधून अग्नीच्या ठिणग्या उडायला पाहिजे होत्या; पण उलट तुझ्या अंत:करणांत भगिनीप्रेमाचं भरतं आलं आहे ! राजकुंवर, तूं मानवी स्त्री नसून यावेळीं माझ्या अभिनंदनाकरितां अवतरलेली देवलोकची एखादी अप्सरा असावीस !

**राज० :** मी अप्सरा ? वाः ! अप्सरेचा कोणता गुण आपल्याला माझ्यांत आढळला ?—हं हं ! हें माझं अचानक येणं अप्सरेसारखं वाटलं वाटतं आपल्याला ?

**शाहू :** कां नाहीं वाटणार ? कुठं सातारा आणि कुठं ही छावणी ! तूं क्षणांत इथं तर क्षणांत तिथं ! तूं अप्सरा जर नाहींस तर इथं अचानक आलीस कशी तें सांग ?

**राज० :** त्यांत काय सांगयचं ? जसं यायचं तशी आलें !

**शाहू :** तें खरं ? पण या धामधुमीच्या काळांत तुझ्यासारख्या सुंदर कुमारिकेनं एकटंदुकटं इतक्या लांबीवर येणं धोक्याचं नव्हे का ? आपल्या पहिल्या भेटीच्या वेळींच तुझ्यावर त्या चोरट्यांनी केवढा प्रसंग आणला होता, आठवतो ना ?

**राज० :** कां नाहीं आठवणार ? या पायांचा लाभ व्हायचा होता म्हणून तर माझ्यावर तो चोरट्यांचा हल्ला देवानं धाडला. मी त्यावेळीं बेसावध होतें. पुरुषाच्या वेषांत जर त्यावेळीं मी असतें—

**शाहू :** अरे वाः ! एकूण पुरुषाच्या वेषांत तूं इथपर्यंत दौड केलीस वाटतं ? तरी म्हटलं, इतका बिनबोभाट प्रवास कसा झाला तुझा ! आमची एक विनंति आहे ऐकतां कां ?

**राज० :** विनंति कां ? वाटेल ती आज्ञा व्हावी, दासी तयार आहे.

**शाहू :** मग आमच्या देखत एकदां पुरुष वेष घ्या आपण.

**राज० :** इश्श मेलं ! हें काय भलतंच ? आम्हीं नाहीं ऐकणार जा असल्या भलत्या सलत्या आज्ञा !

**शाहू :** पण मला पाह्यचंच आहे तुला एकदां पुरुष वेषांत.

**राज० :** पण मला दिसायचं नाहीं आपल्याला तसं. मी त्या वेषांत आपल्यासमोर कधीं यायची नाहीं.

**शाहू** : असं काय ? घे ना एकदां पुरुषाचा वेष; मला पाहूं तर दे तूं कशी दिसतेस ती !

**राज०** : हें काय गडे असं ? मी नाहीं जा. मी म्हणतें, पुरुषाला बायकोच्या वेषांत पाहण्यांत कांहीं मौज तरी असेल. पण बायकोला पुरुषाच्या वेषांत बघून आपल्याला काय आनंद होणार ?

**शाहू** : काय वाटतं; तेंच मला पाह्यचं आहे एकदां. हं घालतेसना ? कुठं आहे तुझा पोषाख ? सांग, मी घेऊन येतों तो !

**राज०** : मी सांगायचीही नाहीं आणि घालायचीही नाहीं तो पोषाख.

**शाहू** : कधींही नाहीं ?

**राण०** : कध्धीं नाहीं. मी कधींही यायची नाहीं आपल्यापुढं त्या पोषाकानं. मग प्राण गेला तरी चालेल !

**शाहू** : कुणाचा ? तुमचा की आमचा ? आमचा प्राण जात असला तरीसुद्धां तुम्ही नाहीं घालणार ?

**राज०** : वा: ती गोष्ट अगदीं निराळी आहे. पण आतां नाहींच ऐकायची मी आपलं !

**शाहू** : हो ! आमचं कशाला ऐकाल ! आम्हीं काय छत्रपति थोडेच आहोंत ! ते-ते छत्रपति आहेत आणि आपण त्यांच्या पट्टराणी व्हायच्या आहांत ! होय ना ?

**राज०** : असली भलती सलती थट्टा माझ्या नाहीं हं कामाला पडायची ! मी आतां मुळीं बोलायचीच नाहीं. आम्हीं इतक्या भेटायला आलों तीं असलीं बोलणीं ऐकून घ्यायला वाटतं ? ( रडते. )

**शाहू** : अरे बापरे ! हें काय केलं आम्हीं ?

**राज०** : बायकांच्या मनाची कल्पना पुरुषांना कधींच यायची नाहीं !

**शाहू** : खरं आहे. ‘ जावें त्याच्या जन्मा तेव्हां कळे. ’ आम्हीं स्वतः बायको झाल्यावांचून आम्हांला कशी बोवा येणार ती कल्पना !

**राज०** : मी सांगतें; मला चिडवूं नका हं उगीच !

**शाहू** : आम्हीं कशाला चिडवूं ! आम्हांला काय उद्योग नाहीं दुसरा ? आमच्या छत्रपति बंधूच्या—

**राज०** : मी जातेंच इथून. चुकी झाली माझी इकडे आलें ती.

**शाहू** : छेः छेः ! राजकुंवर, साधी थट्टाहि तुला सहन होत नाहीं.

**राज० :** ही साधी थट्टा का ? इकडचं प्रेमच नाहीं मुळीं माझ्यावर ! खरं प्रेम जर असतं-तर-

**शाहू :** काय केलं म्हणजे खरं प्रेम आहे असं म्हणशील तूं ? राजकुंवर, ताराऊ-आईसाहेबांनीं माझी विनंती धाब्यावर बसवल्यावर मी निराश होऊन कदाचित् हिमालयांत चालताही झालों असतों; पण केवळ तुझ्याकरितां-तुझ्या प्रेमाखातर-तुला पट्टराणी पाहण्याकरितां मी छत्रपतीपदाच्या मागं लागलों !

( **पद २०—राग** सुहाकानडा **ताल** त्रिवट. )

**तुझ्याविना भाव ना या मना । राजस माना कामुकता ना ॥ धृ० ॥**
**मदिय प्राण उचित दान । प्रिया-आस शमनिं कां न ॥ १ ॥**

तूं पट्टराणी होण्याकरितांच जन्माला आलेली आहेस ! या युद्धांत मी विजयी होणार आणि छत्रपतीच्या गादीवर बसणार, या भविष्यकाळच्या गोष्टीवर कशाला अवलंबून राहातेस ? माझ्या प्रेमाचा प्रश्न बाजूला ठेव आणि त्या शिवाजीची पट्टराणी हो. या युद्धाला इथल्या इथं रजा देऊन मी संन्यास घेण्याकरितां असाच्या असा चाललों पहा.

**राज० :** पण आपल्याला कोण जाऊं देईल तसं ? महाराज ! मी पट्टराणी-पदाकरितां हपापलें आहे, असं कां आपल्याला वाटतं ? या युद्धांत पराजय होऊन आपल्याला रानावनांत अर्धपोटीं उपाशीं राहावं लागलं तरी आपली अर्धांगी होऊन आपल्या सहवासांत राहण्यांतच मला आनंद आहे.

**शाहू :** अहाहा ! मग तुला पट्टराणीपदावर नेल्यावांचून हा युद्धावर निघालेला शाहू आतां स्वस्थ बसणार नाहीं. पातशाही जनानखान्यांत वाढलेल्या या शाहूचा विलासाकडे कितीही ओढा असला तरी माझ्या नसानसांतून वाहणारं छत्रपतीचं रक्त रणांगणाकडेही तितक्याच जोरानं उसळ्या घेऊं लागलं आहे पहा !

**राज० :** अहाहा ! आज माझ्या जन्माचं सार्थक झालं ! माझ्या नेत्रांचं पांग फिटले ! माझ्या जिवाचे क्लेश संपले !

**शाहू :** ते कसे ?

**राज :** महाराज, स्वराज्यासाठीं तळहातावर शीर घेऊन युद्धाला निघालेल्या पंचीप्यान्याला पाहून, खऱ्या जिवलगेला धन्यता वाटल्यावांचून राहील कां ? भिक्षेकऱ्याची दुबळीं वस्त्रं फेकून देऊन, आपल्याला शिपायीगिरीनं सजलेले पाहिल्यावर मला जीव ओवाळून टाकावासा वाटला तर नवल काय ?

**पद २१—राग** खमाज जिल्हा. **ताल** एकताल.

**छुम छुम किंति या मिरविति । गति नसा तनुयानिं ॥ ध्रु० ॥**
**फुलंलि प्रणय-कलिका मृदु । पदिं प्राण वाही ॥ १ ॥**

**शाहू :** आणि म्हणून वाटतं या आनंदाश्रूंच्या मंगलाक्षता आणि स्नेहाळ नेत्रांची पंचारती ! माझी सलोख्याची शिष्टाई निष्फळ ठरली आणि माझा जन्मसिद्ध हक्क शाबीत करण्याकरितां शेवटीं तुझी शिपायगिरीची तरवारच मला स्वीकारावी लागली ! राजकारणाच्या पहिल्या चकमकींतच तूं मला चीत केलंस ! ( डंका वाजतो ) ऐक ऐक, तुझ्या या विजयाचा डंका त्रिभुवनांत दुमदुमूं लागला आहे.

**राज० :** महाराज, शत्रूच्या अंगावर चाल करून जा, म्हणून आपल्या सैन्याला इशारा देण्याकरितां हा डंका गर्जना करीत आहे ! अगबाई ! यावेळीं माझ्या हृदयाचा डंकाही झडूं लागला पहा !

**शाहू :** राजकुंवर, तुझ्या हृदयांत झडणारा तुझ्या प्रेमाचा डंका शाहूच्या अंगांत वीरश्री उत्पन्न करीत आहे ! बंदिवासाच्या क्लेशामुळें निर्जीव झालेल्या माझ्या गात्रांत चैतन्य घालीत आहे ! माझ्या दुर्बळ बनलेल्या मनांत धैर्यादि गुणांचा रस ओतीत आहे ! माझा स्वाभिमान, माझा देशाभिमान जागृत करीत आहे ! ज्या देवतेच्या कृपाप्रसादानं मला या अमोलिक गुणांचा लाभ होत आहे, ती देवता कांहीं काळ दृष्टिआड होणार ना ?

**राज० :** महाराज, नाहीं नाहीं. मी आपल्या चर्मचक्षूंच्या आड झालें तरी अंतःचक्षूंच्या आड मी कधींच व्हायची नाहीं. आपल्याला या युद्धांत उत्तेजन देण्याकरितां निरंतर मी आपल्या हृदयांत वास करीन. ज्या हृदयाचं स्वामित्व माझ्याकडे आलं आहे, तें जर मी क्षणभर गमावलं तर मी शहाणीच म्हणायची ! ( डंका होतो. ) महाराज, ऐका हा दुसरा डंका ! आपलं सैन्य सज्ज होऊन शिस्तीनं कूच करण्याकरितां आपल्या आगमनाची वाट पहात आहे. महाराज, चला-चला, आपल्या सैनिकांचे मुजरे घेऊन त्यांना कृतकृत्य करा.

**शाहू :** राजकुंवर, खरोखरच माझ्या हृदयाचं राज्य तूं काबीज केलं आहेस ! माझ्या प्रेमाचा जामदारखाना तूं जप्त केला आहेस ! माझं स्वातंत्र्य हस्तगत करून तूं मला आपला बंदा गुलाम बनविला आहेस ! तुझ्या हुकुमानं युद्धाच्या धुमश्चक्रींत शिरून मी शत्रूंची कत्तल करीत असलों, डागलेल्या तोफेवर घोडा

घालून ऐन सरबत्तीच्या वेळीं मी गोलंदाजांना कापीत असलों किंवा शत्रूच्या तरवारीनं माझ्या शरीरावर असंख्य वार होऊन माझे प्राण हा लोक सोडून जात असले, तरी माझ्या लाडक्या राजकुंवरला मी विसरणार नाहीं! अशा आणीबाणीच्या प्रसंगींही तो प्रेमाच्या डंक्याचा ध्वनि माझ्या कानीं आल्यावांचून राहणार नाहीं!

( **पद २२—राग** बागेसरी **ताल त्रिवट.** )

**घुमत ध्वनि कां हा। गे प्रणयिनी मम मनीं। गा प्रिया जा राया। अमरपद घ्याया समरिं या॥ धृ०॥ नाचत पूर्वा जाया जिवाची। उधळि स्मितरंग करि गुंग। रविला प्रिय रणिं न्हाया॥ १॥**

( पडदा पडतो. )

---

## प्रवेश तिसरा.

( **स्थळ**—छावणी—खंडोबल्लाळ व धनाजी येतात. )

**खंडो० :** सेनापतीसाहेब, शाहूमहाराजांनीं काय दौड केली ही! सातारचं सैन्य आपल्यावर चालून येणार ही बातमी पोंचली असेल नसेल तों महाराजांचं सैन्य येऊन ठेपलं देखील! शाहूमहाराजांना नेऊन दरबारांत गादीवर बसविण्याकरतां चार पावलं समोर यावं, त्याप्रमाणंच आपलं येणं झालं.

**धना० :** पण शाहूमहाराजांना राजधानींत नेतांना तें अपशकुनी मांजर—तो परशुरामपंत प्रतिनिधी आडवा येणार ना? त्या मांजराला कांहीं तरी युक्ति करून प्रथम पिटाळून लावलं पाहिजे!

**खंडो० :** कांहीं एक युक्ति करायला नको. साहजिकपणानं ज्या गोष्टी घडत आहेत, त्या आपल्या इष्ट हेतूकरतां जणूं काय परमेश्वरच घडवून आणीत आहे.

**धना० :** बरं, शाहूमहाराजांकडे जो जासूद जाऊन आला तो काय म्हणत होता? महाराजांना आपली मसलत पसंत आहेना?

**खंडो० :** पसंत म्हणून काय विचारतां! दौलतीचा बालेकिल्लाच हस्तगत झाल्याप्रमाणं शाहूमहाराजांना झालं आहे. सेनापति, आज हा भ्रमाचा भोपळा फुटणार बरं!

**धना०** : तुम्ही असं कशावरून म्हणतां ? माझी तर अशी इच्छा आहे, कीं शाहूमहाराजांची प्रत्यक्ष रणांगणांत गांठ पडेपर्यंत या प्रतिनिधीला असाच भ्रमांत ठेवायचा !

**खंडो०** : सेनापति, प्रतिनिधी भ्रमांत नाहींत बरं ! आईसाहेबांचा आपल्यावर विश्वास नसल्यामुळंच प्रतिनिधीची नेमणूक मुद्दाम आपल्यावर नजर राखण्याकरतां झालेली आहे !

**धना०** : हें माकड काय आमच्यावर नजर राखणार आणि आमचं शासन करणार ?

**खंडो०** : नांव परशुराम आहे ! सेनापतीसाहेब, संभाळून असा. परशुरामानं एकवीस वेळां पृथ्वी निःक्षत्रिय केली आहे !

**धना०** : तरी पण क्षत्रियांचा नायनाट त्याच्या बापाच्यानंही झाला नाहीं. क्षत्रिय त्या माथेफिरूला पुरून उरले आहेत !

( **पद २३—राग** कामोद. **ताल** एकताल. )

**तो हटला रघुनाथशरें अतुल समरिं परशुधारी। कां**
**दिपला भीष्मबला रणिं अमर हा ॥ धृ० ॥ त्या जनकार्यां**
**क्षत्रिय राजस जागृत जगतिं या ॥ १ ॥**

**खंडो०** : एकएका जातीचा भाग्याचा एक एक काळ असतो. वसिष्ठ विश्वामित्रांच्या वेळीं ब्राह्मणपणाचा मोह सगळ्यांना पडत असे; म्हणून जो तो क्षत्रिय तपश्चर्या करून ब्रह्मर्षीपदाकरतां धडपडत असे ! पांडवांच्या काळीं क्षत्रियवृत्तीची आवड ब्राह्मण वर्गांत उत्पन्न होऊन, द्रोण अश्वत्थाम्यासारखे ब्राह्मण क्षत्रिय होऊं लागले ! या मराठी राज्यांत तर प्रत्येक जातीची उडी शिपायगिरीवर पडत असून लवकरच सारे ब्राह्मण क्षत्रिय झाल्यावांचून रहाणार नाहींत.

**धना०** : असं व्हायचा संभव आहे खरा. पण मला वाटतं, या दोन उच्चवर्णांचा मोह इतर वर्णांना पडणं स्वाभाविक आहे; पण शूद्र व्हावं असं कांहीं कुणाला वाटणार नाहीं.

**खंडो०** : तुमचा समज चुकीचा आहे. माझा तर पक्का समज झाला आहे, कीं कांहीं वर्षांनीं परिस्थितींत पालट पडून, लोक शांततेचा उपभोग घेऊं लागले, कीं ब्राह्मण क्षत्रियच नव्हेत, तर शूद्र अतिशूद्रसुद्धां वैश्यवृत्तीचा स्वीकार करतील आणि वैश्यवृत्तीच्या सहवासानं मनुष्याची मनं क्षुद्र आणि अप्पलपोटीं बनलीं,

कीं ब्राह्मण-क्षत्रिय-वैश्य हे तिन्ही वर्ण शूद्र आतिशूद्राच्या पंक्तीला बसून सबगोलंकार सुरू करतील !

**धना०** : चिटणीस, हें तुमचं पुढचं भविष्य आम्हांला कांहीं पटत नाहीं.

**खंडो०** : पटत नसलं तर सोडून द्या.-पण ते पहा प्रतिनिधी आलेच.

( प्रतिनिधी येतो. )

**प्रति०** : सेनापति, शाहूवर चाल करून जाण्याकरतां आतांच्या आतां कूच करा.

**धना०** : मी संध्याकाळीं कूच करण्याबद्दल हुकूम दिला आहे.

**प्रति** : दिला असेल; पण आतांच कूच करायचा दुसरा हुकूम पाठवा म्हणजे झालं.

**धना०** : तसा हुकूम मी पाठवणार नाहीं.

**प्रति०** : कां ?

**धना** : कां म्हणजे ? माझी मर्जी !

**प्रति०** : तुमची मर्जी ? म्हणजे तुम्ही एवढे कोण ?

**धना०** : मी कोण ?-मी कोण ? छत्रपतीचा सेनापति.

**प्रति०** : मग छत्रपतीचा प्रतिनिधी सेनापतींना हुकूम देतों, कीं तुम्ही आत्ताच्या आतां कूच करा.

**धना०** : तुमचा हुकूम मी मानीत नाहीं. तुम्ही प्रतिनिधी या नात्यानं या स्वारीवर आलां नाहींत. सेनापतीच्या हाताखालचे एक सरदार म्हणून आलां आहांत !

**प्रति०** : नाहीं-सेनापतीवर हुकमत चालवण्याकरतां छत्रपतीचा प्रतिनिधी म्हणूनच मी आलों आहें.

**धना०** : मी तुमची हुकुमत जुमानीत नाहीं; कारण मला आईसाहेबांनीं तशी समज दिलेली नाहीं.

**प्रति०** : तर मग ती समज, ही माझी समशेर दिल्यावांचून राहणार नाहीं. ( तरवार उपसतो ) फितूर ! विश्वासघातकी ! तूं राजद्रोही !

**धना०** : तूं फितूर ! तूं विश्वासघातकी ! तूं राजद्रोही !

**प्रति०** : मी राजद्रोही ! गादीवर हात मारून घेतलेली शपथ अक्षरशः पाळून, आईसाहेबांचं हित चिंतणारा राजद्रोही; का खोटी शपथ घेऊन आईसाहेबांच्या शत्रूला मिळणारा राजद्रोही ?

**धना०** : मीही आपली शपथ अक्षरशः पाळीत आहें. गादीशीं बेमान मी कधींही होणार नाहीं, अशी शपथ मीं घेतली आहे. शाहूमहाराज गादीचे खरे मालक आहेत. त्यांच्याशीं द्रोह करणारा तूंच राजद्रोही ! आईसाहेबांच्या-ताटांतलीं उष्टीं हाडं चघळणाऱ्या कुत्र्या ! तुला खऱ्या धन्याची ओळख कुठून पटणार ? धन्याच्या कमाईचं अन्न चाकरांच्या हातून भक्षण केलंस म्हणून चाकर धनी होत नाहीं समजलास ? तूं माझ्यावर तलवार उपसलीस ! पण मूर्खा, माझी तलवार म्यानांतून निघतांच तुझी काय अवस्था होईल, याची तुला कल्पना तरी आहे का ? तुझी सत्ता तुझ्या तोंडापुरती ! माझी सत्ता–माझा अधिकार स्वयंभू आहे ! गादीच्या मजबुतीकरितां झिजून झिजून क्षीण झालेलीं हीं हाडं, तुझ्या व्यक्तीच्या कल्याणाकरितां पुष्ट झालेल्या हाडांहून जास्त योग्यतेचीं आहेत ! जा, जा, माझ्या समोरून चालता हो. मी तुझा नोकर नाहीं आणि तुझा हुकूम मी मानीत नाहीं.

**प्रति०** : मी प्रतिनिधी या नात्यानं तुला सेनापतीपदावरून दूर करतों आहें. चिटणीस, आत्तांच्या आत्तां हुकूम लिहा.

**खंडो०** : परशुरामपंत, मी सेनापतीसाहेबांच्याबरोबर त्यांना सल्लामसलत देण्या-करितां आलों आहें; सेनापतीच्या उलट आणि स्वराज्याला घातक अशी कृति करायाला आलों नाहीं.

**प्रति०** : तें कांहीं असो, माझा हुकूम तुम्ही मानतां कीं नाहीं ? एकच सांगा !

**खंडो०** : नाहीं–मानीत नाहीं. मीच काय, पण मराठ्यांच्या गादीचा एकही सैनिक तुझा हुकूम मानणार नाहीं !

**प्रति०** : हा भ्रम फुकट आहे. छत्रपतीच्या प्रतिनिधीचा हुकूम प्रत्येकानं मानलाच पाहिजे.

**धना०** : तुझा हुकूम तुझ्या खाजगी फौजेशिवाय एकही सैनिक मानीत नाहीं, हें तुला पहायचं असेल, तर असाच्या असा छावणींत चल. मी शिंग फुंकून सगळ्यांना समोर उभे करतों; आणि प्रतिनिधी म्हणून तुझा हुकूम सैनिक ऐकतात कां माझ्या-सारख्या स्वयंभू सेनापतीचा ऐकतात, याचा अनुभव तुला आणून देतों.

**प्रति०** : पदभ्रष्ट सेनापतीचा हुकूम एकही सैनिक ऐकत नाहीं, असा अनुभव आल्यावर लष्करी कायद्याप्रमाणं तुला आणि या बदमाष चिटणिसाला तोफेच्या तोंडीं देण्याची मीही तयारी ठेवतों. (जातात)

---

## प्रवेश चवथा.

( **स्थळ**—पारदाच्या गढविर सयाजी पाटलाच्या वाड्यांतील एक दालन. मेजवानीचा थाट. मध्यभागीं प्रभावळीचा चौरंग व त्याच्यापुढील चौरंगावर ताट. सर्व मंडळी ताटांवर बसलेली आहे. शाहू व सयाजी येतात. सर्व मंडळी उभी राहून मुजरे करतात. शाहू आसनावर बसतो. )

**सया०** : माझा मुलगा खरोखरच पायगुणाचा ! त्याच्या बारशाच्या निमित्तानं सरकारचे पाय या पाटलाच्या घराला लागले.

**शाहू** : पण पाटील, यामुळं ताराऊ आईसाहेबांचा आपल्यावर केवढा घुस्सा होईल ! पारदच्या सयाजी पाटलानं शाहू छत्रपतीला पाठिंबा दिला आणि त्याला आपल्या मुलाच्या बारशाची मेजवानी दिली, हें ऐकून तर त्यांना तुम्हांला खाऊं कीं गिळूं असं होऊन जाईल !

**सया०** : मग होईना ! मी त्याची थोडीच पर्वा करतों आहें. आमच्या खऱ्या छत्रपतींचं आदरातिथ्य करायला मी प्रत्यक्ष ब्रह्मदेवालाहि भिणार नाहीं. सरकार, ताराऊ आईसाहेबांनीं आपल्याशीं युद्ध पुकारल्यापासून प्रत्येक लढाईत आपलीच सरशी झाली ! प्रतिनिधी सारख्यांना दे माय धरणी ठाय होऊन, त्यांनींसुद्धां पळ काढला ! छत्रपतींचं तेज तें हेंच बरं ! सरकारांनीं गरिबाच्या घरची मीटभाकर गोड मानून घ्यावी.

**शाहू** : ही मीठभाकर का ! प्रत्यक्ष छत्रपतींच्या राजवाड्यांतही होत नसेल इतक्या थाटाची ही मेजवानी आहे ! हीं चांदी सोन्याचीं पात्रं ! पंचपक्वान्नांनीं भरलेलीं ताटं ! ही मानकरी मंडळींची पंगत ! निव्वळ राजेशाही दरबारी थाट आहे ! पाटील, मुलाचं नांव काय ठेवलंय ?

**सया०** : सुवासिनीची पूजा होऊन, त्या जेवायला बसल्या आहेत. भोजन आटोपल्यावर मुलाला पाळण्यांत घालून नांव ठेवण्याची आमची लोखंड्यांची पद्धत आहे. नांव ठेवल्यावर गांवदेवीच्या दर्शनाला नेऊन नंतर सरकारांच्या पायांवर घालीन म्हटलं मुलाला !

**शाहू** : वाः ! आम्हांला आनंद आहे त्यांत !

**सया०** : आतां सरकारांनीं आरंभ करावा. फिरवा पाणी. बोला, 'पार्वतीपते, हरहर महादेव.'

( सर्व हरहर महादेव ओरडतात तोंच राजकुंवर पुरुष वेषांत येते. )

**राज०** : ( शाहूचा हात धरून ) हां हां ! दगा दगा सरकार ! घांस तोंडांत घालाल तर प्राणाला मुकाल !

**शाहू** : म्हणजे ? प्राणाला मुकाल ! तें कां ?

**राज०** : सरकार, हें विष आहे.

**शाहू** : काय विष ?

**राज०** : होय विष ! हें पक्कान्नाचं ताट नव्हे–हें विषान्नाचं ताट आहे ! सरकार, आपला कांटा दुनियेंतून काढून टाकण्याकरितां ताराऊ आईसाहेबांनीं हा कट केला आहे; आणि या कटाचा मुकुटमणि हा पारदचा पाटील आहे.

**सया** : वाः वाः ! एखाद्या अब्रुदार माणसावर भलताच आळ घालून त्याची अब्रू घेतोस काय ? दगलबाज–विश्वासघातकी–गळेकापू—

**राज०** : तूं दगलबाज ! तूं विश्वासघातकी ! तूं गळेकापू !

**शाहू** : हं खबरदार ! पाटलांना अपशब्द बोलशील, तर तुझा मुडदाच पडेल ! पाटील स्वस्थ असा; अशा अलबत्या गलबत्यांच्या शब्दावर विश्वास ठेवून तुमच्या नेकजात इमानीपणाबद्दल संशय घेणारा हा शाहू नाहीं. तूं कोणरे बेवकुब ?

**राज०** : मी कोण तें आपल्याला काय सांगूं ? पण मी एवढंच सांगतों, कीं सरकारांचा जीव ज्याला प्राणाहूनही प्यार आहे, असा मी एक प्राणी आहें ! आणि म्हणूनच मी निक्षून सांगतों, कीं या अन्नांत जहर आहे ! त्रिवार सांगतों, जहर–जहर–जालीम जहर आहे !

**सया०** : हा माझ्यावर नुसतं कुभांड करतोय बरं. महाराज, असला दगा करण्याचं जर कधीं माझ्या मनांत आलं असेल तर माझ्या कच्च्याबच्च्यांची शपथ ? मी ताराऊ आईसाहेबांशीं वांकडा झालों–पाटीलकीवर पाणी सोडलं–तें महाराजांचा खून करण्याकरतां का ? मी बेमान झालों असेन तर माझीं बायकापोरं तडफडून मरतील ! माझ्या घरादाराची राखरांगोळी होईल !

**शाहू** : पाटील, नका असा त्रागा करूं. तुमच्या मनाचं समाधान होण्याकरितां, या पहा मी चित्राहुति–प्राणाहुति–( राजकुंवर शाहूचा हात धरते. )

**राज०** : नका नका महाराज ! ती प्राणाहुति म्हणजे प्रत्यक्ष काळालाच आपल्या बहुमोल प्राणांची आहुति मिळेल.

**शाहू** : सोड, माझा हात सोड. हा हात धरण्याचा तुला काय अधिकार ?

**राज०** : काय अधिकार ? मला–या राजकुवरला काय अधिकार ?

( वेप टाकते. )

**शाहू** : कोण राजकुंवर ?

**राज०** : होय राजकुंवर. माझ्या जिवांत जीव आहे, तोंपर्यंत मी आपल्याला हें अन्न भक्षण करूं देणार नाहीं. माझ्या बोलण्यावर आपला विश्वास नसेल, तर मी स्वतः हें अन्न भक्षण करतें. ह्या जहरी अन्नानं ही राजकुंवर तडफडून मेली, म्हणजे तर आपली खात्री होईल ना ? मी जर मेलें नाहीं तर खुशाल ही कट्यार आपण माझ्या उरांत खुपसावी.

**सया०** : अरेरे ? देवा, कोण हा कांगावा ? काय हा गहजब ? महाराज, हें पहा, मीच खातों तें अन्न; मग तर आपली या चाकराच्या इमानाबद्दल खात्री होईल ना ? ( दुसऱ्या एका ताटांतल्या अन्नाचा घास घेऊं लागतो. )

**राज०** : दगलबाज ! तें नाहीं, या छत्रपतीच्या ताटांतलं अन्न खा. तूं खा, नाहीं तर मी तरी खाऊन प्राण देतें. महाराज, हा पुत्रोत्सवाचा पाहुणचार नव्हे–ही आपल्या प्रेतयात्रेची तयारी आहे ! हे छत्रपतीचे मानकरी नव्हेत–ताराऊ आई-साहेबांचे मानभावी मारेकरी आहेत ! हा आपला पाठीराखा पाटील नव्हे–तर आपल्या प्राणांवर उठलेला कटवाला खाटीक आहे !

**शाहू** : तर मग पाटील, खा या ताटांतलं अन्न ? खा म्हणतोंना–खा-खा–अगोदर.

**सया०** : या ताटांतलं अन्न खाऊन उघड्या डोळ्यांनीं प्राण देण्यापेक्षां, डोळ्यांदेखत या हातांतल्या समशेरीनं तुझा प्राण घेऊन मेलेलं काय वाईट !

( शाहूवर वार करतो तोंच राजकुंवर आडवी येते. )

**राज०** : गळेकापू ! भोग आपल्या कर्माचीं फळं ! ( शाहू व राजकुंवर सयाजीच्या उरांत कट्यार भोंसकतात. सर्व दगा दगा ओरडून शाहूवर हल्ला करतात. )

**शाहू** : हरामखोर–विश्वासघातकी–मारेकरी ! या बेमानाच्या घरादाराला आग लावा. या पारदगांवची राखरांगोळी करा. ( शाहू व राजकुंवर शत्रूशीं लढतात. सैनिक आग लावतात. ) शिपाई हो ! उडवा, धुव्वा उडवा ! या दगलबाज पाटलाचा फडशा उडवा ! अहाहा ! काय मेजवानीचा थाट ! कोण

मानभावीपणाचीं भाषणं ! हरामखोरा ! तूं आम्हांला विषाची मेजवानी घालीत होतास, पण तुझ्याच शरीराची मेजवानी गिधाडांना मिळाली पहा ! शिपाईहो, उडवा कत्तल. तो विश्वासघातकी जसा यमपुरीला गेला तशीच त्याच्या आप्तेष्टांचीही गत होऊं द्या ! उडवा कत्तल ! ( पुतळाबाई आपल्या लहान मुलाला घेऊन येते. )

**पुत०** : ( शाहूच्या पुढें मूल ठेवून ) उडव, उडव याची कत्तल. आपल्या शत्रूचा पुरा पुरा सूड घे. पाटलाच्या घराण्याचा कुलक्षय कर. हा बघ पाटलाचा मुलगा ! हा बघ लोखंड्यांच्या वृक्षाचा अंकूर ! आजच बारा दिवसाचा झाला आहे ! बारशाच्या दिवशींच त्याचा अंत कर ! मी या मुलाची आई–मी पुतळा तुझ्या पायांवर याला टाकून तुझ्या पायाशीं प्राण देतें. आम्हां दोघांनाही पायांनीं तुडवून टाक; नाहीं तर आपल्या समशेरीनं आमची खांडोळीं तरी करून टाक.

**शाहू** : काय ? या तरवारीनं मी तुमचीं खांडोळीं करूं ? या दीन अर्भकाला पायानं तुडवून टाकूं ? बेइमानी बापाचा राग त्याच्या अनाथ बायकांपोरांवर काढूं ? या मुलाच्या नामकरणविधीऐवजीं त्याच्या अंत्यविधीची तयारी करूं ! छेः छेः, पुतळा ! हें तूं काय बोलतेस !

**पुत०** : बोलूं नको तर काय करूं ? राक्षसा ! तूं केवढा अनर्थ केला आहेस, याची कल्पना तरी आहे ? तुझा कुलक्षय होईल ! तुझं राज्य तुझ्याबरोबर लयाला जाईल ! पहा पहा ! या पेटलेल्या घरांत–या अग्नींत माझ्या पतीबरोबर मी सती चाललें पहा. ( आगींत उडी घेते. )

**शाहू** : पतिव्रते ! साध्वि ! माउली ! हा शाहू तुला प्रणाम करतो आहे. तुझ्या शापाची प्रखरता शांत होऊं दे ! ( मूल उचलून ) बाळ ! तुझा पिता गेला नाहीं–मीच तुझा पिता ! तुझी माता तुला टाकून गेली नाहीं मीच तुझी माता !

( **पद २४ राग** मालकंस. **ताल** झपताल.

**या प्रलयीं बा रे । शांति निमिषांत । हृदयीं तुझें ध्यान ।**
**वटिं बाल भगवान् ॥ धृ० ॥ हा बाळ लडिवाळ । हृदया**
**पडे पीळ । नच्च साहि उमाळा । कां बघसी बाळा असा**
**रे ॥ १ ॥**

( आंत ' शाहूमहाराज की जय. ' जोत्याजी व कांहीं लोक येतात.)

**जोत्या० :** सेनापति, धनाजी जाधव आणि चिटणीस सैन्य घेऊन सरकारच्या मदतीला आले. सरकारची फत्ते झाली.

**शाहू :** तर मग या मुलाचं नांव फत्तेसिंहच ! बाळ, तुझं बारसं शृंगारलेल्या घरांत आप्तेष्टांच्या आनंदोत्सवांत, मंगलवाद्यांच्या गजबजाटांत, इतर मुलांच्या बारशाप्रमाणं होत नाहीं. या मैदानाच्या दिवाणखान्यांत, केशराच्या आणि गुलालाच्या सड्याऐवजीं तुझ्या आप्तइष्टांच्या रक्ताचे सडे घालून मी तुझ्या बारशाचा समारंभ साजरा करीत आहें ! पराच्या किनखापी गाद्यागिर्द्यांनीं सजविलेल्या नक्षीदार पाळण्याऐवजीं रक्तानं, भरलेल्या माझ्या राकट हातांच्या पाळण्यांत मी तुला घालीत आहें ! सुवर्ण करंडकांतून तुझ्या मस्तकावर लावलेल्या कुंकुमतिलकाऐवजीं या कट्यारीवरील तुझ्या पित्याच्या रक्ताचा टिळा मी तुझ्या मस्तकीं लावीत आहें ! तुझ्या मुखावर ओवाळल्या जाणाऱ्या रत्नजडित निरंजनाऐवजीं, तुझ्या स्वतःच्या घराची पेटलेली पंचारती मी तुझ्यावरून ओंवाळीत आहें ! आणि तुझ्या मुखांत चिमूटभर साखर घालून तुझं एखादं गोड नांव ठेवण्याऐवजीं ही गोड चुंबनाची शर्करा घालून 'फत्तेसिंग' हे आजच्या प्रसंगाला साजेसं गंभीर नांव मी तुला देतों आहें:—परीसाचा स्पर्श होतांच लोखंडाचं सोनं होतं. या मुलाचा मी पिता होतांच याचं लोखंडे नांव जाऊन हा भोंसले झाला. भोंसल्याची पाटीलकी जाऊन ते जसे राजे झाले, तशीच या मुलाची पाटीलकी जाऊन हाही राजा झाला. या पारदगांवचा आसपासचा मुलुख या मुलाला बहाल करून त्याला मी ' राजा ' करतों आहें. आजपासून हा राजा फत्तेसिंग झाला. शिपाईहो, रणभेरीचा चौघडा झडूं द्या, तोफांची सलामी द्या, आणि राजा फत्तेसिंहाचा जयघोष करा. बोला, राजा फत्तेसिंहकी जय !

(सर्व जयघोष करतात. पडदा पडतो.)

## अंक तिसरा समाप्त

# अंक चवथा.

## प्रवेश पहिला

( **स्थल**—जंगल. प्रतिनिधी कांहीं शिपाई, शुक्रजी व हकीमजीस घेऊन येतात. )

**प्रति०** : हं गप्प रहा. वाचाळपणा जरा आवरून धरा.

**शुक्र०** : हे राहिलों गप्प. हकीमजी घाला तोंडाला कुलूप. अळी मळी गुपचीळी, जो आतां अगोदर बोलेल—

**प्रति०** : हं फाजीलपणा बस्स करा, बोला, इकडे तुम्ही कसली टेहळणी करीत होतां ? शत्रूच्या हेराला आमच्या राज्यांत कसली शिक्षा आहे, तुम्हांला ठाऊक आहे ?

**शुक्र०** : नाहीं बुवा. आम्हांला एवढी कुठून माहिती ? पण आम्ही हेर नाहीं. आम्ही आपले प्रजाजनच आहोंत.

**प्रति०** : मग तुम्हांला ओळखतो असा एकसुद्धां मनुष्य कसा नाहीं अजून सांपडत ? चला ! लायक माणसाची ओळख द्या. नाहीं तर रहा अंधार कोठडींत !

**शुक्र०** : पण मी अगदीं लायक माणसाची ओळख देतों ना !

**हकी०** : मैभी लायख अदमीका पैछान देऊंगा.

**प्रति०** : सांगा, कोण तुम्हांला ओळखतो ?

**शुक्र०** : हे हकीमजी मला ओळखतात.

**हकी०** : और ए पंडितजीभी मुजको पैछानते है.

**प्रति** : वाः ! हा खासा न्याय ! ही चांगली ओळख ! हे त्यांना ओळखतात आणि ते यांना ओळखतात ! वाः ! अहो शहाणे ! असल्या ओळखी चालायच्या नाहींत. तुम्ही हेर अहांत यांत शंका नाहीं—तुम्हांला अंधार कोठडीचीच हवा दाखविली पाहिजे. हेरांना कळलं पाहिजे, कीं या राज्यांत हेरगिरीला असलं बक्षीस मिळतं. ( जासूद येतो. ) काय खबर ?

**जासू०** : शत्रूंनीं अजिमताऱ्याला वेढा दिला आहे. गडावरचं दळणवळण बंद झाल्यामुळें ताराऊ आईसाहेब आणि महाराजांकडची खुशाली कळणं अशक्य झालं आहे.

**प्रति०** : काय शत्रूंनीं गडाला वेढा दिला ? मग त्यांत काय वाईट झालं ! आपण त्यांच्याभोंवतीं वेढा देऊन त्यांचीच दाणारसद बंद करूं. आपण खालून हल्ला करूं आणि वरून ताराऊ आईसाहेबांना हल्ला करण्याबद्दल सूचना देऊं. दोघांच्या कात्रींत करूं या या शाहूचं चंदन. चला एकदम शत्रूवर हल्ला करा. ( जासूद जातो. )

**शुक्र०** : पण आम्हांला सोडा ना ? आम्ही गरीब पोटार्थी; आमचा कां उगीच छळ?

**हकी०** : मै तो एक गरीब फकीर है. दवा देनेकी धंदा करता है. मेरेको क्योंकर सताते हो ?

**प्रति०** : तुम्ही दवा देतां काय ? मग काय हो, वर गडाला पडलेला वेढा उठवण्याकरतां तुमच्याजवळ कांहीं दवा आहे का ?

**हकी०** : ओ दवा आपके पासभी है. इत्ती इत्ती गोली दुष्मनको हरएक आदमी उपर छोडो. सब तबीयत अच्छी हो जाती है.

**प्रति०** : चेष्टा काय करतां ! प्राणावर आली तरी कसली मस्करी ! अहो भामटे ! एक ओळख तरी द्या; नाहींतर जा अंधार कोठडींत. ( धनाजी वेषांतरांत येतो.)

**धना०** : मी यांची ओळख देतों. हे हेर नाहींत हें मी शपथेवर सांगतो. यांची माझी ओळख आहे.

**प्रति०** : पण तुझी आमची कुठं ओळख आहे ?

**धना०** : वा: ! तुमची माझी चांगली ओळख आहे. तुम्ही इतक्या लौकर विसरलां असाल असं मला वाटलं नाहीं.

**प्रति०** : मला तर तुझी ओळख असल्याचं स्मरत नाहीं ! तूं कोण आहेस ?

**धना०** : मी एक शिपाई आहें आणि आपल्या चांगल्या परिचयाचा आहें. आपला कान जरा इकडे कराल तर मी आपलं नांवही आपल्या कानांत सांगेन.

**प्रति०** : काय काय तुझं नांव ? ( कान जवळ नेतो. )

**धना०** : ( त्याच्या कानांत ) मी धनाजी जाधव.

**प्रति०** :( एकदम तरवार उपसून ) धनाजी जाधव !

**शिपा०** : धनाजी जाधव ! अरे बापरे ! पळा पळा ! ( सर्व पळून जातात. )

**शुक्र०** : पळा हरामखोरांनो ! कसे पळाले !

**हकी०** : चलो भागो ! दवडो ! ए भागूबाई !

**प्रति०** : चल हो तयार. संभाळ !

**धना०** : अरे संभाळायचं काय ? आपलाच जीव संभाळ.

**प्रति०** : मला एकट्याला गांठून दगा करतोस काय ?

**धना०** : तुझे शिपाई पळून जाऊं नयेत म्हणून मी तुझ्या कानांत माझं नांव हळूच सांगितलं. पण तूं कसला ! तें मोठ्यानं उच्चारलंस आणि त्या बिचाऱ्यांना पळायला लावून आपण मात्र एकटा राहिलास ! तूं जसा एकटा आहेस तसा मीही एकटा आहें.

(**पद...२५ राग** सोहनी. **ताल** एकताल.)

**हृदय ढाल मन विशाल । मी शिपाई समरिं पायीं ।**
**रिपुदलांत नित्य जात । मज न पाहि कालव्याल ॥ धृ० ॥**
**विपिनिं भ्रमत हा मृगेंद्र । जाति पळुनि ते शृगाल ॥**
**मजसि मारि कां भिकारीं । रविस दिपवि ना मशाल ॥ १ ॥**

**प्रति०** : असें काय ? तर मग घे हें बक्षीस; (वार करण्यास धांवतो.)

**धना०** : हाडुत कुत्र्या ! तुझ्यासारखी कोंबडी फडफडून माझं काय व्हायचं आहे ! तुला असा बगलेंत मारून छत्रपतीसमोर तुझं चंदन उडवितों बघ. (दोघांची झटापट होते. धनाजी प्रतिनिधीच्या छातीवर बसतो. शाहू व सैनिक येतात.)

**शाहू** : शाबास सेनापति ! प्रतिनिधींना पराजित करून तुम्ही या शाहूला अपूर्व जय मिळवून दिलात. (धनाजी प्रतिनिधीच्या छातीवरून उठून त्यास सैनिकांच्या ताब्यांत देतो.) आतां एकदम गडावर हल्ला करा आणि शेवटचा जय मिळवा. हा शेवटचा जय म्हणजे दोन ताऱ्यांचं अधःपतन ! एक गड अजिमतारा आणि दुसऱ्या आईसाहेब-अजिंक्यातारा !

**धना०** : महाराज, या प्रतिनिधींना कैद करून आपल्यासमोर उभं केलं आहे. त्यांची काय ती व्यवस्था करावी.

**शाहू** : प्रतिनिधी, माझा छत्रपतीचा अधिकार कबूल करून आमच्या प्रतिनिधीपदाचा स्वीकार करायला तुम्ही तयार आहांत कां ?

**प्रति०** : खऱ्या छत्रपतीच्या दरबारांत-श्री मातोश्री ताराऊ आईसाहेबांचे पुत्र छत्रपति शिवाजी महाराजांच्या दरबारांत मी भालदारचोपदाराचीहि जागा पत्करीन; पण या तोतया उपटसुंभाचा प्रतिनिधी म्हणून मी कधींच म्हणवून घेणार नाहीं. तुझा हक्कही मी मानीत नाहीं आणि तुझ्या छत्रपतीपदालाहि मी जुमानीत नाहीं.

**शाहू :** आम्ही तुम्हांला प्रतिनिधीपद आपण होऊन देतों, तुमचा इतमाम वाढवितों, मग तुम्हांला आमच्या पक्षाला यायला काय हरकत आहे.

**प्रति० :** शाहू, ही लालुच तूं कोणाला दाखवितोस? मोंगलांच्या दरबारांत औरंगजेबाची थुंकी झेलून आपली सुटका करून घेणारा तूं—मला शाहू समजतोस? नोकऱ्यांची, पदव्यांची, मानमरातबाची हांव ताराऊ आईसाहेबांच्या पक्षांत एकालाही नाहीं. आम्ही प्राण देऊं; पण तुला छत्रपति म्हणून तुझ्यापुढं मान वांकवणार नाहीं.

**शाहू० :** ही बढाई बस्स करा. हिरव्यागार पालवीनं आणि चित्रविचित्र मोहरानं फुगून जाऊन गर्वानं ताठून गेलेले वृक्ष झंझावातापुढं मान वांकवायला नाकबूल झाले, तर उलथून पडल्यावांचून रहात नाहींत? मुकाट्यानं माझ्यापुढं मान वांकवून तीन वेळां मुजरा कर नाहीतर महामस्त पाहिलवानांना तुझ्या छातीवर बसवून दाबून तुझे डोळे बाहेर काढीन?

**प्रति० :** डोळे बाहेर पडून प्राण गेला तरी बेहेत्तर; पण तुझ्यापुढं मान वांकवणार नाहीं अगर तुला छत्रपति म्हणून मुजराही करणार नाहीं.

**शाहू :** कोण आहेरे! या उन्मत्त प्रतिनिधीस आडवा पाडून त्याच्या उरावर एक दगड ठेवा; आणि छाती दाबदाबून याचा प्राण घ्या. ( शिपाई प्रतिनिधीला पाडून त्याच्या छातीवर दगड ठेवून बसतात. ) प्रतिनिधी, अजून माझी सत्ता कबूल कर आणि माझ्यासमोर मान वांकवून मला मुजरा कर.

**प्रति० :** शरीरांत सामर्थ्य आहे तोंपर्यंत तुझी सत्ता कधींही कबूल करणार नाहीं, अगर तुला मुजराही करणार नाहीं.

**शाहू :** शिपाईहो, दाबा, जोरानं दाबा. ( शिपाई दाबतात. ) प्रतिनिधी, पुन्हा सांगतों सत्ता कबूल कर.

**प्रति० :** नाहीं! जिवांत जीव आहे तोंपर्यंत ' नाहीं ' हींच अक्षरं माझ्या मुखांतून बाहेर पडतील.

**शाहू :** हरामखोरा, मर तर मग. शिपाईहो, टाका एकदम चिरडून!

( खंडोबल्लाळ येतो. )

**खंडो० :** महाराज! केवढं पुण्यकर्म आपण चालवलं आहे! आपल्या वडिलांचा संभाजी महाराजांचा आत्मा संतुष्ट झाला असेल आपलं हें कृत्य पाहून! प्रतिनिधींचा अत्यंत क्रूरपणानं वध करून आपण संभाजी महाराजांचे खरेखुरे पुत्र आहांत हें सिद्ध करून दाखवीत आहांत! महाराज, आतां आपणाला तोतया

म्हणण्याची कुणाची छाती आहे ? आपल्या राज्यारोहणप्रसंगीं किती ब्राह्मणांना स्वर्गारोहणाला पाठविणार आहांत ? इमानी आणि नेकजात माणसांच्या रक्तानं आपल्याला राज्याभिषेक करून घ्यायचा असेल, तर ही माझी मान तयार आहे. हे सेनापतिहि आपली छाती पुढं करतील आणि आपल्या पदरचे कित्येक सरदार आपल्या इच्छेला मान देण्याकरतां हूंचू ही न करतां आपल्या तरवारीखालीं माना देतील ! आप्तेष्टांच्या आणि इमानी नोकरांच्या प्राणांचे बळी घेणाऱ्या संभाजीमहाराजांच्या पुत्राला बापाला कैदेंत टाकून भावांचे खून करणाऱ्या सद्गुरु औरंगजेबानं योग्य शिक्षण दिलं !

**शाहू** : चिटणीस, खरोखर रागाच्या भरांत माझ्या हातून भलतंच कृत्य घडत होतं. शिपाईहो, काढा तो दगड प्रतिनिधीच्या छातीवरून. (सैनिक त्याप्रमाणें करतात.)

**खंडो०** : महाराज, स्पष्ट बोलतों, याबद्दल क्षमा करावी.

**शाहू** : बोला स्पष्ट बोला. स्पष्ट बोलल्याबद्दल राजकोपच काय पण परमेश्वरी कोप झाला तरी जो जुमानीत नाहीं तोच मनुष्य !

**खंडो** : महाराज ! असामान्य क्षमाशांति अंगांत वसत असल्यावांचून मनुष्य राजा म्हणून घ्यायला पात्रच होत नाहीं. प्रतिनिधी आपले शत्रू असले तरी आपल्या धन्याशीं-आईसाहेबांशीं ते इमानीच आहेत. या त्यांच्या इमानाबद्दल वाहवा करायची, कीं क्रूरपणानं असा त्यांचा प्राण घ्यायचा ? प्रतिनिधी जर आपल्या पक्षाला मिळत नसतील तर राजकैदी म्हणून मर्जी लागेल तोंपर्यंत त्यांना बंदीखान्यांत ठेवावं हवंतर.

**शाहू** : जशी तुमची इच्छा. जारे प्रतिनिधींना घेऊन. ( सैनिक प्रतिनिधीला घेऊन जातात. ) चिटणीस, तुम्ही आणि सेनापति, तुम्ही मराठेशाहीची खरी शिक्काकट्यार आहांत ! ही शिक्काकट्यार-ही कामधेनु आपल्या पायांनीं माझ्याकडे चालत आली ! ही शिक्काकट्यार मस्तकावर धारण करूनच हा शाहू छत्रपतीची गादी चालवील !

( **पद २६—राग** देसकार. **ताल** झपताल. )

**सुखद जगिं राजा । शास्ता बलवान् । जो झटत दिन**
**रात । उचित जनकाजा ॥ धृ० ॥ या रणीं साह्यार्थ । हा**
**बलि महाराष्ट्र । राजकाज तरवार । कां न यश मम**
**ध्वजा । काजा ॥ १ ॥** ( जातात. )

---

## प्रवेश दुसरा

( **स्थळ**—शिर्क्यांच्या वाड्यांतील देवीचें देवघर. )

**राज** : ( स्वगत ) प्रणयिनी आपल्या प्रियकराच्या चिंतनांत जो काळ घालविते, तो तिला स्वर्गतुल्यच वाटतो ! कां नाहीं वाटणार ? प्रियकराची मनोहर मूर्ति हृदयाच्या देवघरांत विराजमान झाल्यावर, प्रेमविरहित विचारांना पाऊल ठेवायला तिथं जागाच राहात नाहीं. वीरश्रीनं धुंद झालेले प्रतिस्पर्धी योध्दे एकमेकांशीं निकरानं लढून जसे शेवटीं गतप्राण होतात, तशीच प्रेम्यांची स्थिति आहे ! प्रेमाच्या युद्धांत प्रणयशरांनीं विव्हळ होऊन शेवटीं प्रेमी एकमेकांचे गुलाम बनतात ! ही गुलामगिरी म्हणजेच प्रेमाचं रहस्य ! या गुलामगिरीचा माझ्यावर ताबा बसल्यापासून शाहू महाराजावांचून मला कांहीं एक दिसत नाहीं. त्यांचं सुख तें आपलं सुख—त्यांचं दुःख तें आपलं दुःख—त्यांचा विजय तो आपला विजय अशी तदाकारवृत्ति बनून, मला सर्व जागीं शाहूमहाराज दिसूं लागले आहेत ! ( शुक्रजी येतो. )

**शुक्र०** : घात झाला हो ताईसाहेब, घात झाला ?

**राज०** : घात झाला, कसला घात झाला !

**शुक्र०** : घात झाला—आमचं सर्वस्व गेलं—आम्हीं आज उघडे पडलों ! आमचं राज्य आटोपलं !

**राज०** : कायहो, काय झालं हो ! बोला बोला लवकर. शाहूमहाराज—

**शुक्र०** : शाहूमहाराज, आतां कुठले—

**राज०** : अग बाई ! शाहूमहाराजांचं कांहीं भलतं सलतं तर नाहीं झालं ?

**शुक्र०** : अहो, त्यांचं भलतं सलतंच झालंहो ! त्यांचा जय झाला !

**राज०** : मग तुम्ही असे रडतां कां ?

**शुक्र०** : त्यांचा जय झाला म्हणून आम्ही रडतों. शत्रूचा जय झाल्यावर कुणाला तरी आनंद होईल का ?

**राज०** : हें काय वेड !

**शुक्र०** : ताईसाहेब, आपल्यालाच वेड लागलं आहे हो. आपण कुणाच्या राज्यांत आहांत, आपल्याला भान आहे का ? ताराऊ आईसाहेबांचा मुलुख आहे हा आणि शाहूमहाराजांचा जय झाला. आतां आपणच सांगा, आपण कसं

वागलं पाहिजे तें. मला तर वाटतं, कीं आपण यावेळीं घंगाळभर पाणी पुढ्यांत घेऊन बसायला पाहिजे होतं !

**राज०** : तें कां ?

**शुक्र०** : तुमच्या राजनिष्ठेचं प्रदर्शन करण्याकरतां ! ताराऊ आईसाहेबांचा पराजय ऐकून तुम्हांला इतकं दुःख झालं, कीं तुमच्या डोळ्यांतून एवढं थोरलं पाणी गळलं, हें दाखविण्याकरतां. मी तर यावेळीं काय करणार आहें सांगूं ? नदीच्या कांठीं जाऊन बसणार आहें आणि डोक्यावर चार तांब्ये पाणी घेऊन सगळीकडे दवंडी पिटणार आहें, कीं ताराऊ आईसाहेबांच्या पराभवाचं वृत्त ऐकून शुक्रजीच्या नेत्रांतून अश्रूंचा पर्जन्य पडून, त्याची भली मोठी नदी वाहूं लागली आहे !

**राज०** : वाः !

**शुक्र०** : वाः काय ! वाः बी करूं नका ! तुम्हीं एक शिंगाड्या बोलावून त्याच्या जवळून मोठ्यामोठ्यानं शिंगाच्या आरोळ्या ठोकवा.

**राज०** : त्या कशाकरतां हो ?

**शुक्र०** : कशाकरतां ? तुमच्या शोकप्रदर्शनाचा मासला दाखविण्याकरतां. रडतां रडतां तुमचा घसा बसून, पुढचा शोक अर्धाच राहूं नये म्हणून ! बघा माझं ऐका, हीं रडण्याचीं वाद्यें तुम्हीं अवश्य सुरू करा. राजकर्त्यांची मर्जी जर संभाळायची असेल, तर असं कांहीं तरी करणं भाग आहे.

**राज०** : मग एवढ्याकरतां हा तुमचा शोक झाला ! मला वाटलं, सेनापति–चिटणीस जसे आईसाहेबांचा पक्ष सोडून शाहूमहाराजांना मिळाले, तसे तुम्ही शाहू महाराजांना सोडून आईसाहेबांना मिळाला ! मग तुमचं हें ढोंग होतं सगळं ?

**शुक्र०** : अहो, मोठ्यानें बोलूं नका; भिंतीला कान आहेत. तुमच्या अगदीं कानांत सांगतों; राज्यकर्ते आपला मतलब साधण्याकरतां, सोंग घ्यायला लागले, कीं प्रजेलाही असलीं ढोंगं करणं भाग पडतं !

**राज०** : तें राहूं द्या. तुम्हीं कां आलांत तें सांगा.

**शुक्र०** : ताईसाहेब, सरकारांनीं प्रतिज्ञा केली आहे.

**राज०** : कसली प्रतिज्ञा केली आहे ?

**शुक्र०** : कीं त्यांच्या आणि आपल्या लग्नाच्या वेळीं एक लक्ष मुंडक्यांची रास आपल्या चरणावर वाहायची.

**राज०** : काय अघोर प्रतिज्ञा ही !

**शुक्र०** : यांत कसली अघोर प्रतिज्ञा ! कैलासनाथ शंकर नव्हता का माणसांचीं मुंडकीं गोळा करून सतीला संतुष्ट करीत ? आणि सतीही त्यांची माळ तयार करून, तीं शंकराच्या गळ्यांत घाली ? ताईसाहेब, शाहूमहाराजही शंकराचा अवतार आहेत. सतीप्रमाणं त्या लाख मुंडक्यांची माळ तयार करून द्या शाहूमहाराजांच्या गळ्यांत लटकवून—

**राज०** : सतींत आणि माझ्यांत शुक्रजी तुम्हांला साम्य दिसलं म्हणूनच तुम्ही असं बोलतां आहांत. सतीचा पिता दक्ष शंकराचा द्वेष करी, बाबाही तिकडचा द्वेष करतात. दक्ष शंकराचं देवत्व कबूल करून त्याला यज्ञाहुति देण्याला तयार नव्हता; बाबाही शाहूमहाराजांचं छत्रपतित्व कबूल करून त्यांना कारभार द्यायला तयार नाहींत. पित्यानं केलेला अपमान सहन न होऊन सतीनं यज्ञकुंडांत घेतली, तशी ही राजकुंवर—ही सती—सतीचाच कित्ता गिरवील. शाहूमहाराजांचा अपमान करून त्यांचा प्राणवर—

**शुक्र०** : ताईसाहेब, शाहूमहाराजांचा अपमान करण्याची कुणाची छाती आहे ? शाहूमहाराजांच्या प्राणावर संकट आणण्याची कुणाची प्राज्ञा आहे ! शाहू महाराज आपल्या फिरंगी समशेरीनं जगदंबेपुढें बोकडांच्या मुंड्या उडवाव्यात त्याप्रमाणं आपल्या शत्रूंची मुंडकीं उडवीत आहेत.

**राज०** : त्यांच्या घराण्याला साजेसाच पराक्रम आहे. आई शिर्काबाई ! शाहूमहाराजांना विजयी कर; शंभर बोकडांची दावण देईन.

**शुक्र०** : ताईसाहेब, आपल्या या देवीला बोकड बळी चालतो ?

**राज०** : हो तर. आमची देवी मोठी जाज्वल्य आहे. दर मंगळवार—शुक्रवारीं, एक बोकडाचा नैवेद्य तिला द्यावा लागतो ! आणि नवरात्रीच्या पूर्णाहुतीला तर एकशें आठ बकरीं बळी द्यावीं लागतात. आज मंगळवार आहे; आज एक बोकडाचा नैवेद्य होईल.

**शुक्र०** : होय का ? मी इकडे येत होतों, तों माझ्या मागून एक बोकड आला आहे. मी त्याला घेऊन येतों. ( शुक्रजी हकीमजीची मुंडी धरून त्याला आणतो व वांकवतो ) द्या याला बळी.

**राज०** : शुक्रजी, हें काय ? हकीमजीला इथं कशाला आणलंत ?

**शुक्र०** : मी त्यांना मनुष्य म्हणून इथं आणलं नाहीं, बोकड म्हणून आणलं आहे. बोकडांत आणि याच्यांत काय भेद आहे ? बोकडाला चार पाय असतात—

हकीमजीही यावेळीं चार पायांवर उभे आहेत! बोकडाला दाढी असते– हकीमजीला लांब दाढी आहे ! बोकड बिचारा निरुपद्रवी असतो–हकीमजीही अगदीं निरुपद्रवी आहेत ! द्या त्यांना बळी.

**हकी०** : अफसोस ! पंडतजी, ए क्या मषकरी है ? छोडो मुझको.

(आंतून शिर्के 'कुठं आहे कार्टी' असें ओरडतो.)

**राज०** : अगबाई ! सोडा त्यांना आणि अगोदर येथून बाहेर जा. बाबा जर इथं आले आणि त्यांनीं हकीमजीला ईथं पाहिलं, तर बघायलाच नको–एक घाव दोन तुकडे ! चला लवकर, बाहेर जा अगोदर.

**शिर्के** : ( आंतून ) कुठं आहे ? देवघरांत ?

**राज०** : अगबाई ? इकडेच आले. लपा लपा, त्या दाराआड लपा लवकर आणि बाबा आंत येतांच चटकन् निघून जा. ( दाराच्या आड लपतात. शिर्के आंत येतो, शुक्रजी हकीमजी पळून जातात. ) हं असं !

**शिर्के** : कार्टे ! कुलांगार कार्टे ! अवदसे !

**राज०** बाबा, हें काय ? इतकं रागवायला काय झालं ?

**शिर्के** : काय झालं ते आपल्या मनाला विचार. करून सवरून पुन्हां नामानिराळी ! साऱ्या शहरभर त्या गोष्टीचा बभ्रा; पण मी आंधळा स्वस्थ घोरत पडलेला ! ताराऊआईसाहेबांनीं झणझणीत अंजन घालून मला जागं केलं आणि तुझ्या निर्लज्जपणाचं चित्र माझ्यापुढं उभं केलं ! कार्टे ! अग राक्षसणी ! एवढं सोंग करायला कुठं शिकलीस ! त्या हरामखोर शाहूवर तूं एवढी कशी भाळलीस? त्या भिकाऱ्यावर तूं अशी कशी फिदा झालीस ?

**राज०** : हां बाबा, हें काय ? शाहूमहाराजांना भिकारी कां म्हणतां ? ते तर राजे आहेत. त्यांना भिकारी म्हणतां ?

**शिर्के** : अहाहा ! केवढा कड आला पण ! भिकारी नाहीं तर काय ! आमच्या ताराऊआईसाहेबांकडे भिक्षा मागायला आलेला तो दिल्लीचा फकीर; असल्या फकिराच्या भुलथापांना बळी पडून तूं आपलं सर्वस्व गमावून बसलीस ! लाज नाहीं वाटत ?

**राज०** : यांत कसली लाज ? शाहूमहाराजांना मी स्वामी म्हटलं यांत कसला कमीपणा ? कैलासावर फिरणाऱ्या एका फकिराला सतीनं नाहीं कां आपला देह अर्पण केला ?

**शिर्के** : तसा तूंही आपला देह शाहूला अर्पण करून, कार्टे, माझ्या घराण्याला कलंक लावलास ! माझ्या बेचाळीस कुळ्या नरकांत घातल्यास ! माझ्या राजनिष्ठेला बट्टा लावलास !

**राज०** : बाबा, असं भलतंच काय बडबडतां ! शाहूमहाराजांवर माझं प्रेम बसलं, त्यांनाच वरण्याचा मी निश्चय केला, यांत मी आपल्या घराण्याला कलंक कसा काय लावला ? आपल्या खऱ्या राजाच्या स्वाधीन हा देह केला, यांत मी तुमच्या राजनिष्ठेला कसला बट्टा लावला ? शाहूमहाराजच आमचे राजे—

**शिर्के** : कार्टे, शाहू आमचा राजा नव्हे; शिवाजी आमचा राजा. ज्यानं शिर्क्यांचं शिरकाण करून आम्हांला नेस्तनाबूद करण्याचा प्रयत्न केला, त्या संभाजीच्या कार्ट्यांची तूं राणी होण्यापेक्षां या कट्यारीशींच मी तुझं लग्न लावीन.

**राज०** : तर मग खुशाल लावा कट्यारीशीं माझं लग्न. शाहूमहाराजांना टाकून त्या वेड्या छत्रपतीशीं जर तुम्हीं माझं लग्न लावाल—

**शिर्के** : छत्रपति आणि लग्न ! त्या गोष्टीच आतां विसर. शाहूनं भ्रष्ट केलेल्या पोरीला छत्रपतीच काय पण त्यांच्या तैनातींतला हुजऱ्या तरी पत्करील कां ? पोरी ! माझ्या ममतेची तूं माती केलीस ! माझ्या वात्सल्यप्रेमाची तूं होळी केलीस ? माझ्या फाजील लाडानं तूं उनाड मैना बनलीस ! असल्या पापी पोरीचा कुळधर्म करून मी आपल्या पितरांना आणि कुलस्वामिनीला आज संतुष्ट करतों. चल हो तयार. तुझ्या रक्तानं माखलेली तरवार ताराऊआईसाहेबांना नजर करून त्यांचा खवळलेला आत्मा मला शांत करूं दे. चल, रहा उभी कुळस्वामिनीसमोर.

**राज०** : ही मी आई शिर्काबाईसमोर उभी आहें. जर मी आजपर्यंत अनन्य भावानं तिची सेवा केली असेल, धर्माला अनुसरून मी जर माझं कौमार्य अढळ राखलं असेल, शाहू छत्रपतींना पती मानण्यांत जर माझा अपराध झाला तसेल तर तीच माझं रक्षण करील.

**शिर्के** : जय आई भवानी तुळजापुरवासिनी ! हा घे तुझा बळी. ( राजकुंवरवर तरवारींचा वार करतो. राजकुंवरच्या अंगांत देवीचा संचार होऊन ती आरोळी फोडते. शिर्क्यांच्या हातांतील तरवार गळून पडते ) आई शिर्काबाई ! शांत हो, शांत हो. या लेंकराच्या हातून काय अपराध घडला सांग. चुकीची क्षमा कर आणि काय इच्छा असेल ती सांग.

**राज०** : ( देवी ) ऐक—सावधान.

**शिर्के** : ऐकतों आहें. आई, मी सावध आहें.

**राज०** : ( देवी ) तुला माझ्या खरेपणाची प्रचिती आली? सांग नसली आली तर.

**शिर्के** : आली-आई अंबाबाई ! अगदीं बरोबर प्रचिती आली.

**राज०** : ( देवी ) काय प्रचिती आली ? आपल्या तोंडानं सांग.

**शिर्के** : राजकुंवरचा शिरच्छेद करण्याकरतां मी तिच्या मानेवर तरवारीचा वार केला; पण तिला जरासुद्धां जखम झाली नाहीं.

**राज०** : ( देवी ) तुझी खात्री झाली ? नसली खात्री झाली तर आणखीं खात्री करून घे.

**शिर्के** : आई, माझी पूर्ण खात्री झाली ! मी अज्ञ आहें, अपराधी आहें. तुझी काय इच्छा आहे तें सांग.

**राज०** : ( देवी )-ऐक. राजकुंवरच्या मनाविरुद्ध जाऊं नकोस. तूं तिच्या कुंवारपणाबद्दल संशय घेतलास ? तिला आतांपासून सकुवार म्हण; आणि तिचं शाहूछत्रपतीशीं लग्न कर. पतीबरोबर सती जाऊन ती उभयकुलांचा उद्धार करील ! शाहूला मी प्रसन्न आहें. तोच खरा छत्रपति आहे. त्याला सहाय्य कर हीच माझी आज्ञा आहे.

**शिर्के** : आई शिर्काबाई ! तुझी आज्ञा मला प्रमाण आहे.

**राज०** : ( देवी ) आतां मी अंतर्धान पावतें. ( डोकें जमिनीला टेकून आंग टाकते. शिर्के तिच्या पायाला वंदन करतो. )

**शिर्के** : बाळ सावध हो ! ( डोळ्याला पाणी लावतो. )

**राज०** : ( सावध होऊन ) मी कुटं आहें ? इथं ! मग मला स्वप्नच पडलं सारं.

**शिर्के** : बाळ, तुला काय स्वप्न पडलं ?

**राज०** : तुम्ही रागावाल. मला स्वप्न पडलं, कीं तुम्ही होऊन माझं शाहूमहाराजांशीं लग्न लावलंत. पण तें स्वप्नच !

**शिर्के०** : बाळ, तुला पडलेलं स्वप्न अक्षरशः खरं होणार. मी शाहूछत्रपतीनांच तुला अर्पण करणार; कारण कुलस्वामिनीची तशी आज्ञा आहे.

**राज०** : काय !आई शिर्काबाईची आज्ञा !आई भवानी ! अशीच संकटकाळीं धांवून कुबुद्धीच्या पिशाचापासून आमचं रक्षण कर.

**शिर्के** : पोरी, त्या पिशाचानं मलाच पछाडलं होतं. पण आई भवानीनं तुझ्या आंगांत संचार करून मला वांचवलं ! राजकुंवर-नव्हे सकुवार-देवीनं मला आज्ञा केली आहे. मी तुला सकुवारच म्हणणार ! सकुवार, मी तुझा निष्कारण

छळ केला. तुला बोलूं नये तें बोललों. तुला ठार करायला मी प्रवृत्त झालों. तूं माझ्यावर रागावूं नकोस. त्या नीच अवदसेनं, त्या ताराऊनं—

**राज०** : बाबा, ताराऊ आईसाहेबांना अवदसा म्हणतां ?

**शिर्के** : हो म्हणतों. माझं कोण काय करणार आहे ? मी ताराऊला शत्रू लेखतों—शाहूला छत्रपति मानतों—आणि स्वतःला त्याचा सेवक समजतों. खोटं वाटतं तुला ? काय केलं म्हणजे खरं वाटेल ? बोल काय करूं तें ? फौज तयार करून आतांच्या आतां शाहूला जाऊन मिळूं ? सांग, सांग काय करूं तें.

**राज०** : अहाहा ! बाबा तुम्हांला कुठं ठेऊं, असं मला झालं आहे ! तुम्ही फौज तयार करतां ?—करा. पण पुढं काय करायचं तें माझ्यावर सोपवा. सोपवतां कां ?—ऐकतां कां—ऐकतां का माझं ? पुरवतां कां आपल्या मुलीचा एवढा तरी हट्ट ?

**शिर्के** : तुझा कोणता हट्ट तूं पुरा केल्यावांचून ठेवला आहेस ? तुम्ही पट्टराणी होणाऱ्या पोरी ! आमच्या पांढऱ्या केंसांना थोड्याच जुमानतां ? बरं, सैन्य तयार करतों. पुढं काय करायचं तें तूं कर.

(शिर्के जातो.)

**राज०** : हें उत्तम झालं ! शाहूमहाराजांनीं गडाला वेढा दिलाच आहे. आपल्या फौजेच्या आतां दोन तुकड्या कराव्यात. एक बरोबर घेऊन आपण राजवाड्यावर छापा घालावा आणि दुसरी बाबांच्या बरोबर देऊन त्यांना दिल्ली दरवाजावर हल्ला करून, शाहूमहाराजांना वर येण्याचा मार्ग खुला करून द्यायला पाठवावं। एका घटकेंत दुनिया किती उलटी पालटी झाली पहा ! एका क्षणापूर्वी खवळलेल्या बाबांच्या तरवारीनं कापली जाणारी मी आतां त्याच बाबांना माझ्याप्रमाणं वागायला लावतें आहें !

(**पद २७—राग** जीवनपुरी **ताल** त्रिवट.)

**किति फुलल्या गगनिं या तारा । मेघ वितळा वायु**
**निवळला । हंसत हंसत शशि दावि वाकुल्या ॥ धृ० ॥**
**ये शांतता कालतुफाना । नाचति नौका जलधिविहारा।**
**डुलति झुलति किति बाला ॥ १ ॥** (जाते.)

---

## प्रवेश तिसरा

[ **स्थळ**—राजवाड्यांतील एक दालन, शिवाजी येतो. ]

**शिवा० :** ( स्वगत ) लढाईच्या गप्पा ऐकायला मोठ्या गोड ! पण तीच लढाई अंगाशीं येऊन भिडली कीं आटोपलं ! ( तोफांचे आवाज होतात ) अरे बापरे ! हे तोफांचे आवाज थांबतच नाहींत ! त्या आवाजाबरोबर उरांत जी धडकी भरते ती विचारूं नका. भीतीचा मंत्र मघांपासून दहा वेळां म्हटला; पण अद्याप ही तोफांच्या धूमधडाक्याची भीति जात नाहीं ! ( तोफेचा आवाज ) अग आईग ! मंत्र म्हणून पाहूं एकदां गणपतीचा !

|| मोरेश्वरा बा करुणा करावी । भांड्यांत दारू थोडी भरावी ||
|| गनीम येतो भडीमार होतो । लहान्या मुलांचा जिव फार भीतो || १ ||

( तोफांचा आवाज. )

अरे देवा ! पुन्हां आवाज ! शाहूनं गडाला वेढा दिला आहे. त्यानं हा तोफेचा मारा चालवला आहे ! त्याला कशी भीति वाटत नाहीं तोफांची कुणाला ठाऊक ! आमचे वडील लढाईला जात; आजोबाही जात असत म्हणतात. ते म्हणे फार मोठे होते ! पण फारच लबाड होते बरं ! लढाईची वेळ आली म्हणजे शत्रूला अशी झुकांडी देत, कीं बोलायची सोय नाहीं ! मला वाटतं, ते माझ्यासारखेच लढाईला भीत असावेत, म्हणून अशी कांहीं तरी युक्ती काढून शत्रूच्या हातून निसटून जात !-शाहू जर गड चढून आला आणि मला शोधूं लागला तर आपण कसं निसटावं ? आजोबांच्या अकलेच्या सवाई दिढीवर अक्कल दाखविली पाहिजे ! ( पावलें वाजतात. ) अरे बापरे ! शाहूच आला कीं काय ? चाहूल इकडेच येत आहे. आतां काय करावं !-हा शेल्याचा पदर असा डोक्यावरून घेऊन बायकोच आहोंत असं भासवावं ! ( शेला गुंडाळून तोंडावरून पदर घेतो ) आतां ये म्हणावं ! ( ताराऊ येते. )

**तारा० :** कोण आहे तें !

**शिवा० :** अरे देवा ! आईसाहेब !-आतां काय करावं !

**तारा० :** बोलत कां नाहींस, कोण आहेस तूं ? ( स्वगत ) ही स्त्री तर नाहीं. शाहूनं कोणी मारेकरी तर माझ्यावर पाठवला नाहीं ना ? ( उघड ) कोण तूं ! बोल, नाहींतर—

**शिवा० :** ( आवाजांत बदल ) मी ती ठकी !

क्षत्रियकन्यांचा जन्मसिद्ध हक्क आहे, तो हक्क मीं हातीं घेतला आणि आपल्या वेडप्या चिरंजिवांना नाकारून शाहूमहाराजांना वरलं, यांत आपलं तोंड काळं तें काय केलं ? उलट आईसाहेब, आपल्या प्रत्येक डावांतून शाहूमहाराजांना वांचवून मीं आपलं तोंड उजळ केलं आहे !

**तारा० :** हेंच सांगायला तूं इथं आली आहेस आटतं ? दोन डावांत देवानं तुला यश दिलं म्हणून चढून जाऊं नकोस ? डावपेचांच्या पाऊलभर पाण्यांत तूं कुठं आतां उतरते आहेस. मी राजकारणाचा अथांग सागर पोहून पार गेलें आहें. पतीच्या मागं मराठी राज्याचा गाडा एकहातीं बिनबोभाट चालवून मीं आपल्या कर्तबगारीनं साऱ्या दख्खनला धाकांत ठेवलं आहे. माझी बरोबरी करूं नकोस–

**राज० :** मी आपली मुळींच बरोबरी करूं इच्छित नाहीं. आईसाहेब, आपण क्षत्रियाच्या कुळांत जन्माला आलां आहांत–मीही त्याच कुळांत जन्म घेतला आहे. आपण छत्रपतींची पट्टराणी झालांत, मीही छत्रपतींची पट्टराणी होत आहें. पतीच्या पश्चात् आपण राज्यकारभार चालविलांत आणि मलाही तो चालवतां येणार नाहीं असं नाहीं ! पण त्यापेक्षां मी सहगमन श्रेष्ठ समजतें. पतीच्या मागं दिमाखानं कर्तबगारी दाखविण्याची हांव धरण्यापेक्षां सतीचं वाण घेऊन पतीची कीर्ति मी अजरामर करणंच मला भूषणावह वाटतं !

**तारा० :** तर मग आपल्या स्वयंवराबरोबर सतीचं वाण घ्यायलाही तयार हो. ही पहा मीं चाललें शाहूचा शिरच्छेद करायला ( आंत ' शाहू छत्रपतीकी जय ' असा घोष होतो. )

**राज० :** ऐका ! आईसाहेब, ऐका हा शाहू महाराजांचा जयजयकार ! अजीमतारा सर झाला ! शाहू महाराजांचं सैन्य गडावर घुसलं ! आतां आपण काय करणार ?

**तारा० :** काय करणार ? माझ्या मनांत येईल तें ! अशीच जातें आणि शाहूची धूळधाण उडवतें ! ( जाऊं लागते. )

**राज० :** मग अशीच मी आपल्याला अटकाव करतें !

**तारा० :** मला अटकाव करणारी तूं कोण ?

**राज० :** मी कोण ? मी शिर्क्यांची राजकुंवर ! शाहूछत्रपतींची पट्टराणी ! आपली भावी सून ! आपल्याला अटक करतें. आईसाहेब, आमच्या शिर्क्यांच्या शिलेदारांनीं राजवाड्याला गराडा दिला आहे. इथून जाण्याची गोष्ट आतां विसरा !

**तारा० :** विसरा ? मी नांवाची तारा आहें समजलीस !

**राज० :** पण ही तारा आतां अस्ताला चालली आहे ! आपण मावळत्या महाराणी आहांत, मी उगवती पट्टराणी आहें ! माझी अटक आपल्याला मानलीच पाहिजे !

**तारा० :** तूं उगवती आणि मी मावळती होय ! कार्टे, अवदसे, तुझी अटक तुझ्या उरांत ही कट्यार खुपसून मी दूर करतें ( कट्यार उपसून राजकुंवरवर धांवते. )

**राज० :** तुझ्या कट्यारीशीं झुंज घ्यायला माझी कट्यार कमजोर आहे असं समजूं नकोस. मीही मढ्याचं दूध प्यायलें नाहीं. ( ताराऊवर धांवते, तोंच शिर्के येतो. )

**शिर्के० :** हंः ! सकुवार हें काय ? आईसाहेबांवर कट्यार ? ही सास्वासुनांच्या कट्यारी कट्यारींची चकमक झडत होती वाटतं ? आईसाहेब, माझ्या पोरीवर कट्यार ?

**तारा० :** शिर्के ! राजकुंवरला ठार करण्याबद्दल मी तुम्हांला आज्ञा केली होती ना ?

**शिर्के :** होय आईसाहेब ! आपली तशी आज्ञा होती खरी !

**तारा० :** मग राजकुंवर जिवंत कशी ?

**शिर्के :** तशी शिर्काबाईची आज्ञा झाली म्हणून. आईसाहेब, राजाच्या आज्ञेपेक्षां देवाची आज्ञाच मला जास्त वंद्य आहे. त्या आज्ञेला अनुसरून मी शाहू महाराजांचं छत्रपतीत्व मान्य केलं आणि गडाचे दरवाजे मोकळे करून, त्यांचा माझ्या मुलीशीं विवाहकरण्याकरतां त्यांना गडावर घेऊन आलों.

**तारा० :** शेवटीं तुम्हीही फितुर झालांत ! जा तुम्ही इथून या कार्टीला बरोबर घेऊन ! तुमचीं काळीं तोंडं मला पहायला नकोत.. ( जाते. )

**राज० :** बाबा खरंच चला ! दीनवाण्या स्थितींत माणसाला हिणवणं चांगलं नाहीं. ( शिर्के जातो. ) शाहूमहाराज गडावर आले ! आतां काय राहिलं ? एक त्यांचं राज्यरोहण आणि दुसरं माझं पाणिग्रहण !

( **पद २८ राग** भैरवि. **ताल** त्रिवट. )

**पाहिन मी सखया जिवा या । वाहिन काया त्या झुल-**
**वाया । रिझविन प्रेमभरें हृदिं या ॥ धृ० ॥ रणीं चम-**
**कला राजस राया । शाहु छत्रपति हा या । नाचति या**
**वृत्ति प्रियासि गावया ॥ १ ॥**

( जातात. )

---

## प्रवेश चवथा

( **स्थळ**—छत्रपतीचा दरबार. सेनापती वगैरे अष्टप्रधान, खंडोबल्लाळ, शिर्के व सरदार दरकदार बसले आहेत. )

**भाल०** : श्री गोब्राह्मणप्रतिपालक क्षत्रिय कुलावतंस श्रीछत्रपति शाहू महाराज सिंहासनाधीश्वर ! ( शाहू व जोत्याजी, मानकरी वगैरे येतात. सर्व खडी-ताजीम देतात. )

**खंडो०** : महाराज, या छत्रपतीच्या गादीवर आरोहण करावं.

**शाहू** : या छत्रपतीच्या गादीवर आरोहण करण्यापूर्वी सर्व सरदार दरकदारांना माझा असा सवाल आहे कीं, शिवछत्रपतीच्या या नातवाचा—संभाजी महाराजांच्या या पुत्राचा या गादीवर बसण्याचा हक्क कायदेशीर आणि सर्वांना पसंत असाच आहे ना ?

**धना०** : छत्रपतीच्या गादीचा हक्क खऱ्या छत्रपतीनं आपल्या तेजानं सर्वांना कबूल करायला भाग पाडलं आहे. अजून जर हा हक्क कुणाला कबूल नसेल, तर ही माझी तरवार तो कबूल करायला भाग पाडील.

**खंडो०** : महाराजांचा या गादीवरचा जन्मसिद्ध हक्क सर्वांना कबूल आहे. अष्ट-प्रधानांपैकीं ज्या व्यक्तींना तो कबूल नाहीं, ते ताराऊ आईसाहेबांची बाजू धरून आमच्याशीं द्रोह करीत आहेत. राजद्रोही लोकांचा प्रधानपदावरील हक्क कायद्यानंच नष्ट झाला असल्यामुळं महाराजांच्या आज्ञेनं नवीन अष्टप्रधान नेमले आहेत. कै. राजाराम महाराजांनीं निर्माण केलेलं प्रतिनिधीपद नष्ट करावं अगर कुणीं धारण करावं, याबद्दल महाराजांची जशी आज्ञा होईल, तशी व्यवस्था करण्यांत येईल. ( शाहु गादीवर बसतो. )

**शाहू०** : चिटणीस, तुम्ही आजपर्यंत बजावलेली कामगिरी लक्ष्यांत येऊन मी या छत्रपति प्रतिनिधीपदावर तुमची स्थापना करतों.

**खंडो०** : महाराज , क्षमा करा. आपण कृपाळू होऊन मला ज्या पदावर चढवीत अहांत त्या पदाचा स्वीकार मला करतां येत नाहीं. थोरल्या शिवाजीमहाराजांनीं आपल्या राज्यरोहण प्रसंगीं माझे वडील बाळाजी आवजी यांना अष्टप्रधानांपैकीं एक पद स्वीकारण्याची आज्ञा केली; पण स्वामींच्या सेवेंत अंतर पडेल म्हणून वडिलांनीं

ती गोष्ट अमान्य केली. महाराज, त्या बाळाजी आवजीचाच मी पुत्र आहें. महाराजांनीं खूष होऊन मला देऊं केलेलं प्रतिनिधीपद माझ्या इच्छेस येईल त्या पुरुषाला सरकारांनीं द्यावं एवढीच विनंति आहे.

**शाहू०** : बोला, बोला, तुमची कोणाचीही इच्छा पुरी करण्यांत मला आनंदच आहे.

**खंडो** : तर मग परशुरामपंतांचे चिरंजीव श्रीपतराव यांना हें प्रतिनिधीपद देऊन प्रतिनिधीच्या घराण्यावर कृपादृष्टि राखावी, हीच विनंति आहे.

**शाहू०** : ठीक आहे. प्रतिनिधीचीं वस्त्रं श्रीपतरावांना द्या. ( श्रीपतरावांना वस्त्रें देतात. ) बरं शिर्के, आईसाहेबांची समजूत पडली का ?

**शिर्के०** : महाराज, ताराऊआईसाहेबांची समजूत करण्याचा मीं पुष्कळ प्रयत्न केला, पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. दरबारांत येऊन सरकारांची चांगली झाडणी करावी अशी त्यांची शेवटची इच्छा आहे.

**शाहू०** : तर मग त्यांची इच्छा त्यांना पूर्ण करून घेऊं द्या. मनुष्याच्या आयुष्याचा नेम नसतो ! न जाणो अस्मानी सुलतानी होऊन त्यांच्या जिवाचं बरं वाईट झालं तर त्यांना पिशाच योनींत रहावं लागून सद्गति मिळणं दुरापास्त होईल !

**शिर्के** : त्या इकडेच यायला निघाल्या होत्या, पण मी त्यांना येऊं देत नव्हतों. तरी पण मला न जुमानतां त्या दरबाराच्या महाद्वारापर्यंत येऊनही ठेपल्या.

**शाहू** : तर मग त्यांना शंभर वर्षें आयुष्य आहे, यांत शंका नाहीं. येऊं द्या त्यांना आंत. घेऊं द्या आमचा समाचार! त्यांचीं रागाचीं भाषणं सहन करण्याची शक्ति शाहूच्या अंगीं आहे हें सर्वांच्या नजरेस पडूं द्या.

( ताराबाई, शिवाजी, राजसबाई, संभाजी येतात. )

**शाहू** : ( गादीवरून खालीं येऊन ) उभयतां आईसाहेबांचा हा शाहू आशीर्वाद मागत आहे.

**तारा०** : तुझ्या राज्यारोहण प्रसंगीं तुला आशिर्वाद देण्याकरतांच मी आलें आहें; पण माझा आशीर्वाद तुला मंगलप्रद होणार नाहीं. मी तुला शतायुषि हो असा आशीर्वाद देत नाहीं. तूं अल्पायुषि हो, अगदीं यावेळीं आपलं या लोकांचं वास्तव्य उठव, असाच मी तुला आशीर्वाद देत आहें.

**शाहू** : आपण वाटेल तो आशीर्वाद द्यायला मुखत्यार आहां. आपल्या आड

कोण येणार ? पण त्या आशीर्वादाचा माझ्यावर परिणाम होणं मात्र आपल्या किंवा माझ्या पुण्याईवर अवलंबून आहे. आपण 'अल्पायुषि हो' असा जरी मला शाप दिलात तरी माझ्या पुण्याईनं, मी उतार वयापर्यंत जगणार नाहीं कशावरून ? पण तें जाऊं द्या. आईसाहेब, मी जरी छत्रपति झालों तरी राजमाता म्हणून आपल्या इतमामांत बिलकूल कसूर होणार नाहीं.

**तारा०** : आग लागो तुझ्या इतमामाला ! माझा इतमाम तूं राखायला नको आहेस; तो राखायला माझी मी समर्थ आहें. मी या दरबारांत तुझ्या तोंडून हीं इतमामाचीं पोकळ वचनं ऐकायला आलें नाहीं तर तुझ्या सामर्थ्याचा–तुझ्या वैभवाचा धिःकार करण्याकरितां आलें आहें.

**शाहू** : तें मी समजून आहें.

**तारा०** : तूं समजून आहेस, तसेंच हे तुझे दरबारीही समजून आहेत. प्रसंग पडेल त्याप्रमाणं पगडी फिरवणारे हे दरबारी, राजाची खुशामत करून त्याचा गळा कापणारे हे अधिकारी आणि प्रजेचें रक्त शोषण करून आपल्या मुत्सद्दी-पणाचं कौतुक करणारे हे कारभारी तुझा केसानं गळा कापल्यावांचून रहाणार नाहींत. तुझ्या दौलतीचा फन्ना उडवल्यावांचून ते स्वस्थ बसणार नाहींत. तुझ्या सत्तेचा शेवट केल्यावांचून जीवाला शांती मिळणार नाहीं.

**शाहू** : आईसाहेब, माझ्याबद्दल आपल्याला इतकी काळजी वाटूं देऊं नका. हें राज्य माझं नाहीं. सर्व मराठ्यांच्या–सगळ्या प्रजेचा त्याच्यावर हक्क आहे. हा त्यांचा हक्क जन्मसिद्ध आहे. त्यांच्या हक्काची त्यांना जाणीव देऊन त्या हक्काचा उपभोग घ्यायला त्यांना तयार केलं पाहिजे.

**( पद–२९ राग** वसंत. **ताल** त्रिवट. )

**बादशाहि वाया लोकां । नृपतिसमचि जन सबल व्हावया ॥ धृ० ॥ जन–जनार्दना भजुनि राया । समजे लौकिक तनु धन वाया । महाभाग तो खचित अवतारी ॥ १ ॥**

**तारा०** : या तुझ्या वेडगळ कल्पना तुलाच लखलाभ होवोत ! यावरून मी तर असं अनुमान काढतें, कीं असल्या कल्पनांनीं शेवटीं तुझ्या बुद्धीला भ्रंश होऊन तूं हें राज्य भटाभिक्षुकांच्या हवालीं करशील–

**शाहू** : माझ्या राज्यांतले भटभिक्षुक राज्य चालवायला लायक झाले आहेत

असें दिसून येतांच सर्व राज्यकारभार मी त्यांच्यावर सोपवीन! आणि आपलं कार्य उत्तम तऱ्हेनं पार पडल्याबद्दल समाधान मानून मी परलोकीं प्रयाण करीन!

**तारा०** : तथास्तु! मी येतें आतां. माझं काम संपलं. मी दरबारांत येतांच किती दरबारी खालीं मान घालतात हें पहाण्याकरतां मी इथं आलें होतें. पण एकही निर्लज्ज मान वर करून माझ्याकडे पहायला कचरत नाहीं. शाहू, मी आज आपल्या परिवारासह ही तुझी विधवा राजधानी सोडून चालती होणार. माईसाहेब, ही ताराऊ अशी दुराग्रही आहे. तुमची आणि बाळमहाराजांची ताटातूट करून तिनं तुमचा छळ केला! आजपासून हा शाहू छत्रपति झाला आहे. तुम्ही मायलेकरं त्याच्याजवळ एकत्र राहा. तुमच्याकरतां व बाळमहाराजांकरतां तो स्वतंत्र जहागिरी तोडून देईल.

**राजस०** : आईसाहेब! आपण कशाही असलांत तरी आम्हांला आपल्या बरोबर रहाणं भाग आहे. घरांत फाटाफूट करून घराण्याचा नायनाट करणं मला मुळींच पसंत नाहीं. बाळमहाराज, आपण शाहूजवळ राहून जहागिरीचा उपभोग घेतां कां?

**संभा०** : आई, जळेना ती जहागिरी! मला काय करायची आहे? जिकडे तूं तिकडे मी. शाहू, तुझ्या जहागिरीचा उपभोग घेण्यापेक्षां मी ताराऊ आईसाहेबांच्या छळांत सुखानं कालक्रमणा करीन. हा मी आपल्या आईला बरोबर घेऊन ताराऊ आईसाहेबांच्या बरोबर चाललों.

**शाहू** : हा बाणेदारपणा शिवाजी महाराजांच्या वंशजाला शोभण्यासारखाच आहे. आईसाहेब, आपणांपैकीं कुणीही इथून जावं अशी माझी इच्छा नाहीं. आपल्याकरतां स्वतंत्र मुलुख तोडून देतों.

**तारा०** : आग लागो त्या मुलुखाला! तुझ्या उपकारांच्या भाकरीनं संतुष्ट राहणारी ही तारा नाहीं. ही तारा स्वयंप्रकाशी आहे. तूं उसन्या तेजानं लखलखीत दिसणारा आहेस पण मी राज्य कमावणारी आहें. तूं आयत्या पिठावर रेघोट्या ओढणारा आहेस. राज्य संस्थापन करणाऱ्या त्या थोरल्या शिवाजी महाराजांप्रमाणं ह्या त्यांच्या सुनेच्या अंगींही नवीन राज्य निर्माण करण्याचं सामर्थ्य आहे. आंधळ्या, तुझ्या डोळ्यांदेखत तुझ्या नाकावर टिचून मी करवीर प्रांतांत नवीन राज्याची स्थापना करतें. मी तुझ्या तोंडावर बजावतें, कीं

मोंगलांच्या कैदेंत आपला मराठी बाणा विसरून नेभळा बनलेल्या पुरुषाच्या अंगीं थोरल्या छत्रपतींची गादी चालवून कार्य तडीस नेण्याची धमक नाहीं. ही ताराऊच नवीन राज्य स्थापन करून तें कार्य तडीला नेऊन दाखवील!
( ताराऊ, राजसबाई, शिवाजी व संभाजी जातात. )

**धना० :** महाराज, घातकी शत्रूंना असे मोकळे सोडूं नका. कैदखान्यांत किंवा अंधारकोठडींत त्यांना ठेवलंत तरी आपणांला कुणीही दूषण देणार नाहीं. मी एकदम जाऊन त्यांना पकडून आणतों. ( जाऊं लागतो. )

**शाहू :** हं थांबा, शिवाजी महाराजांच्या सुनांना आणि नातवांना कैदखाना? सेनापति, तुम्ही शुद्धीवर आहां ना? स्वातंत्र्याची हवा खाण्याकरतां धडपडणाऱ्या विभूतींना कैदखाना? अंधारकोठडी? धिःकार असो या वैभवाला! कैदखान्याचीं गुलामगिरीचीं दुःखं या शाहूच्या स्मृतींतून अद्याप गेलीं नाहींत. शिवाजी महाराजांच्या वंशजांना कैदखान्यांत–गुलामगिरींत ठेवणारी राजसत्ता उलथून पडल्यावांचून राहणार नाही. सेनापति, आईसाहेबांबरोबर एक सैन्याचं पथक देऊन त्या जातील तिकडे त्यांना जाऊं द्या.

**धना० :** जी हुकूम.

**शिर्के :** महाराज! हा दरबार संपण्यापूर्वी मला आमच्या कुलस्वामिनीची आज्ञा पार पाडायची आहे. आमच्या सकुवारचं सरकारवर प्रेम असून तिच्याबरोबर लग्न करण्याचं आपण तिला वचनही दिलं आहे. सकुवार, ये अशी पुढं
( राजकुंवर बुरखा घेऊन येते. शिर्के तो काढतो. )

**शाहू :** राजकुंवर, स्वराज्यासाठीं तूं माझ्या हातांत तरवार दिलीस! दगेखोरांच्या डावांतून माझा जीव वांचवलास! आणि ताराऊ आईसाहेबांना अटक करून तूं मला छत्रपतीपदाचा लाभ करून दिलास!

**राज० :** यांत मी विशेष तें काय केलं? स्वतःच्या इच्छेप्रमाणं पती मिळवला!

**शिर्के :** एकूण काय? तिनं स्वयंवर केलं! मीही आतां आपल्या पुराण काळच्या पद्धतीप्रमाणं, या माझ्या कन्येचा हात आपल्या हातांत देतों, त्याचा स्वीकार करावा. ( राजकुंवरचा हात शाहूच्या हातांत देतो. )

**शुक्र० :**
**हकी० :** } शुभमंगल सावधान!

**शाहू :** कोण शुक्रजी–हकीमजी?

**शुक्र०** : महाराज, आम्हांला आपण विसरलांत असं वाटून आम्ही दिल्लीला जायचा बेत केला होता, पण–

**शाहू** : मी कुणालाही विसरणं शक्य नाहीं. थोरापासून गरीबापर्यंत सर्वांना न्यायानं आणि ममतेनं वागवून प्रजेला सुखी करणं हेंच माझं व्रत ! आजपासून श्रीमंत–गरीब, ब्राह्मण–शूद्र, हिंदु–मुसलमान, असा भेदभाव माझ्या राज्यकारभारांत नाहीं, याला साक्ष ही शिक्का–कट्यारच ! ही शिक्काकट्यार पट्टराणीपदाचा मान म्हणून आजच मी माझ्या राजकुंवरला अर्पण करतों. ( शिक्का–कट्यार राजकुंवरच्या हातांत देतो. )

## भरतवाक्य.

( पद–३० राग हिंदोल. ताल एकताल.)

**गा जय जनता । अर्पुनियां तनमन । भारत–पदिं ॥ ध्रु० ॥**
**जातिधर्मवैरभाव मार्ग न हा स्वातंत्र्या । ऐक्यभावरत जन व्हा ॥१ ॥**

( पडदा पडतो. )

**समाप्त**

# दुर्मिळ नाटकांचें पुनर्मुद्रण

श्री. मा. आ. कामतकृत

संगीत

## तोफेच्या तोंडीं

व

## थोरांचा थोर

श्री. द. का. भिंगार्डेकृत

संगीत

## स्वराज्य--तोरण

श्री. सदाशिव वामन जोगकृत संगीत

## आमची जात

कै. गणेशशास्त्री फाटककृत

## स्वर्ग साम्राज्य

## स्वर्ग सुंदरी

## सासुरवास

[ प्रथमावृत्ति ]

वरील नाटकें लवकरच प्रसिद्ध होतील.

पुस्तकें मिळण्याचें ठिकाण

**बलवन्त पुस्तक भाण्डार,**

गिरगांव नाका, मुंबई नं. ४.